# नवभारत

ऑगस्ट - २०१५

- भीमसेन जोशी यांची गायकी
- इतिहासाचे लेखन आणि पुर्नलेखन
- मर्ढेकरांच्या काव्यावरील आंग्लकवींचा प्रभाव
- वीणा आलासे आणि कवी अनिल
- राष्ट्रपती वटहुकमाची संसदीय प्रासंगिकता
- पुरुषसूक्तांचा आधुनिक अर्थ



अनुक्रमणिका

मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास

राज्य मराठी विकास संस्थद्वारे संगणकीकृत

नवभारत ७५ अमृतमहोत्सवी वर्ष

द्वारा प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई – ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com
मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास
नोंदणी क्र. एफ.१६०९४(मुंबई)
स्वातंत्र्याचा अमृत महोत्सव

# निवेदन

राज्य मराठी विकास संस्था, मुंबई ही महाराष्ट्र शासनाने स्थापन केलेली स्वायत्त संस्था आहे. मराठी भाषा विभागाच्या पत्राप्रमाणे (संदर्भ क्र. मसंस २०१६/प्र.क्र.११५/२०१६/भाषा-२, दि. ३ जानेवारी, २०१७) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे '**महाराष्ट्रातील मराठी संशोधन मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य योजना**' कार्यान्वित करण्यात आली असून या योजनेअंतर्गत महाराष्ट्रातील मराठी भाषा, साहित्य व संस्कृती वृद्धिंगत होण्यासाठी काम करणाऱ्या महाराष्ट्रातील मान्यताप्राप्त मंडळ/ संस्थांना अर्थसाहाय्य करण्यात येते.

सदर प्रकल्पांतर्गत प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांना राज्य मराठी विकास संस्थेद्वारे नवभारत मासिकांचे ऑक्टोबर १९४७ ते सप्टेंबर २०१७ पर्यंतच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासाठी अर्थसाहाय्य करण्यात आले होते. याअंतर्गत सदर अंकांचे संगणकीकरण करण्यात आले असून **प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांनी हे अंक जतन केलेले असल्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.**

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

**स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व प्राज्ञपाठशाळामंडळ, वाई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.**

अनुक्रमणिका

प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई संचालित मासिक

# नवभारत

वर्ष ६८। अंक ११। ऑगस्ट २०१५
निज आषाढ/श्रावण शके १९३७
वार्षिक वर्गणी ४०० रुपये
या अंकाची किंमत रु. ३०/-



## नवभारतची भूमिका*

मानवाच्या व मानवसंस्कृतीच्या विकासास व उन्नतीस पोषक होईल अशा प्रकारे महाराष्ट्रीय जीवनाचा व संस्कृतीचा विकास करणे, हे या मासिकाचे ध्येय व उद्दिष्ट आहे.

ध्येयप्रवण व्यक्तींनी स्वोन्नतीच्या हेतुपूर्तीसाठी जे आपले सांस्कृतिक मूल्यमापन ठरविलेले असेल, उच्च वातावरणातील जो अभिजात अनुभव स्वतःच्या साधनेने संग्रहीत केलेला असेल, त्याचे दिग्दर्शन हेच संस्कृतिपोषक वाङ्मय होऊ शकते, असा संचालक व संपादक-मंडळ यांचा विश्वास आहे.

या मासिकात येणाऱ्या लेखांत कोणत्याही विशिष्ट मताचा, वादाचा, पक्षाचा किंवा पंथाचा प्रचार करण्याचा हेतू नाही.

संचालक व संपादक-मंडळातील सर्व व्यक्ती यांचेही सर्व विषयांत मतैक्य आहे, असे नाही. मानवी जीवनविषयक व सांस्कृतिक मूल्यांसंबंधी सदृश अशा दृष्टिकोणानेच त्यांना एकत्र आणले आहे. तथापि प्रत्येकाचे व्यक्तिवैशिष्ट्य व विचारस्वातंत्र्य यांचा विनाश न होता विकास व्हावा, या दृष्टीनेच त्यांचे सहकार्य राहील. प्रत्येक व्यक्ती आपल्या नावाने प्रसिद्ध होणाऱ्या लेखाबद्दलच जबाबदार राहील.

मासिकात प्रसिद्ध होणाऱ्या प्रत्येक लिखाणात सत्यनिष्ठा, संयम आणि सहिष्णुता असतील, अशी काळजी घेतली जाईल.

*नवभारत, ऑक्टोबर १९४७, वर्ष १ ले, अंक १ मधील कै. शंकरराव देव यांच्या 'संचालकांचे मनोगत' मधून.



संपादकीय पत्रव्यवहार :
संपादक, *नवभारत* मासिक,
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा).
फोन : (०२०) २५६७४०९३.

व्यवस्थापकीय पत्रव्यवहार :
नीता गायकवाड
व्यवस्थापक, नवभारत मासिक
द्वारा : प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५, गंगापुरी,
वाई - ४१२८०३ (जि. सातारा)
फोन : (०२१६७) २२०००६.



अनुक्रमणिका

# नवभारत

## ऑगस्ट २०१५

## अनुक्रमणिका

---

# भीमसेन जोशी ह्यांची गायकी

गणेश उमाकांत थिटे

भारतरत्न पं. भीमसेन जोशी ह्यांच्यावर वर्तमानपत्री लेखन पुष्कळ झाले. तीन मराठी आणि एक इंग्रजी पुस्तक त्यांच्या चरित्रावर लिहिले गेले. मात्र त्यांच्या गायकीविषयी तुलनेने फार थोडेच लिहिले गेले आहे. जे लिहिले गेले ते केवळ ते एक श्रेष्ठ गायक होते हेच पुन:पुन: सांगणारे, असे लिहिले गेले. तरीही त्यांच्या गायकीचा आशय आणि आविष्कार तसेच त्यांच्या लोकप्रियतेचे किंवा श्रेष्ठतेचे नेमके कारण कोणते, ह्याविषयी फारसे लिहिले गेलेले नाही. प्रस्तुत लेखात त्यांच्या वैयक्तिक जीवनाविषयी विशेष काही लिहिणे अभिप्रेत नसून गाण्याचीच चर्चा करणे अभिप्रेत आहे. काही वैयक्तिक उल्लेख आल्यास ते आनुषंगिक समजावेत.

भीमसेन जोशी ह्यांचे एक ठळक वैशिष्ट्य म्हणजे त्यांना फारच तरुण वयापासून लोकप्रियता लाभली. ती उत्तरोत्तर वाढतच गेली. शास्त्रीय संगीताच्या क्षेत्रात एवढी मोठी लोकप्रियता आणि राजमान्यताही मिळालेला गायक गेल्या दोन-तीनशे वर्षांच्या ज्ञात इतिहासात दुसरा नाही. त्यांच्या वयाच्या पंचवीस ते तीसच्या सुमारासच ते सिद्धहस्त गायक म्हणून स्वीकारले गेले; आणि शेवटची तीन-चार वर्षे वगळून शेवटपर्यंत ते गातच राहिले आणि लोकप्रियता टिकवून ठेवू शकले. संगीताच्या क्षेत्रात वापरले जाणारे "जोश" आणि "होश" हे शब्द त्यांच्या बाबतीत सुमारे पन्नास-पंचावन्न वर्षे उत्तमपणे टिकून राहिले, ही गोष्ट सामान्य नाही. तरी बारकाईने आणि दीर्घकाळ त्यांचे गायन ऐकणाऱ्याला त्यांचा "जोश" (सामर्थ्य) जो त्यांच्या वयाच्या पन्नाशीपर्यंत होता, तितका तो नंतर राहिलेला नव्हता हे लक्षात येत असे. मात्र तो मुळातच इतका प्रचंड होता, की तो कमी झाला तेव्हाही इतर तरुण गायकांच्या पेक्षाही दसपट असल्याने तो कमी झाल्याचे प्रथमश्रवणक्षणी लक्षातच येत नसे; आणि "होश" (बुद्धिमत्ता) तर प्रतिदिनी वाढतच असल्यामुळे शेवटपर्यंत त्यांचे गाणे परिणामकारकच राहिले.

आता ह्या "जोश" किंवा शारीरिक सामर्थ्य ह्या विषयांचा थोडा परामर्श घेऊ. भीमसेन जोशी ह्यांचे आरोग्य आणि शारीरिक क्षमता असामान्य होती. महाभारतातील भीमच त्यांच्या रूपाने गदायुद्धाचे आपले क्षेत्र सोडून संगीताच्या क्षेत्रात अवतरला असावा, असे वाटण्याइतके त्यांचे गायनातील शारीरिक सामर्थ्य अतीव अजोड असे. ह्याचे प्रत्यंतर त्यांच्या आवाजाच्या पल्ल्यावरून येत असे. त्यांचा आवाज तीन सप्तके निर्दोष रीतीने वर-खाली होत असे. पण विशेष उल्लेख केला पाहिजे तो म्हणजे त्यांच्या प्राणायामशक्तीचा. गातांना "री" ओढणे हा प्रकार त्यांच्याबाबत विलक्षण प्रदीर्घ असे. "री" ओढली, की श्रोत्यांचा दम दोन-तीनदा संपे; परंतु भीमसेनजींचा दमसास तुटत नसे. एकदा मी घड्याळात पाहून दीड मिनिटापर्यंत त्यांनी "री" ओढलेली ऐकलेली आहे. अशा वेळी श्रोत्यांचाच दमसास सुटून दर अर्ध्या मिनिटाला टाळ्या पडत आणि दोन-तीनदा अशा टाळ्या पडत. हीच अवस्था पुन: तानांच्या बाबतीतही होत असे. तालाची दोन-तीन आवर्तने होऊन गेली, तरी त्यांची तान चालूच राही; आणि तानेच्या शेवटच्या भागात किनऱ्या आवाजात ते जो एक अलंकार त्या तानेला जोडत, त्यामुळेही श्रोत्यांकडून टाळ्यांचा वर्षाव होत असे. हे दृश्य त्यांच्या वयाच्या साठीपर्यंत पाहण्यास मिळत होते. पुढेपुढे ताना तुटक होऊ लागल्या. परंतु ज्यांनी त्यांचे तरुणपणीचे गायन ऐकले आहे, त्यांनाच हा फरक जाणवत असे. त्यांच्या वयाच्या सत्तराव्या वर्षी जे श्रोते तरुण होते, त्यांनी आधीचे गायन ऐकलेले नसल्यामुळे भीमसेनजींचा दमसास आता कमी झाला आहे, आता पूर्वीइतकी लांबलचक तानबाजी किंवा "री" ओढणे हे प्रकार राहिलेले नाहीत, हे त्यांच्या लक्षात येत नसे. कारण

अनुक्रमणिका

इतर गायकांकडून भीमसेनजींच्या वृद्धपणातील सामर्थ्याइतके सामर्थ्यही त्यांना अनुभवण्यास मिळत नसे. त्यामुळे भूतकाळातील, वर्तमानकाळातील आणि बहुधा भविष्यकाळातील अनेक पिढ्यांपर्यंत भीमसेन जोशींचे गाणे अतुलनीय राहणार ते त्यांच्या गाण्यातील प्रचंड शरीरसामर्थ्याच्या आविष्कारामुळे, असे म्हणता येईल.

ह्या उत्तम आरोग्यामुळेच दिवसातून तीन-तीनदा मैफली करणे, किंवा शेकडो मैल स्वतः मोटरड्राइविंग करून येऊनही न थकता पुनः पाच-सहा तास पूर्ण जोमाने मैफल रंगवणे हा त्यांच्या बाबतीत एक नित्याचाच भाग होता. संस्कृत साहित्यशास्त्रात वीररसाचा स्थायिभाव "उत्साह" हा सांगितला आहे. गाण्याच्या क्षेत्रातील त्यांच्या असाधारण उत्साहामुळे ते शब्दशः "गानवीर" होते, ही गोष्ट निर्विवाद आहे. पुढे पुढे ते विमानातून जाऊ लागले. त्यामुळे पु. ल. देशपांडे त्यांना "हवाई गंधर्व" असे विनोदाने म्हणत. पण त्यात अतिशयोक्ती किंवा विनोद नव्हता, तर ती वस्तुस्थितीच होती.

गेल्या शतकातील साठच्या दशकाच्या अखेरीपर्यंत त्यांची एक मैफल म्हणने किमान सहा-सात तासांची श्राव्य मेजवानीच असे. सुरुवातीला एक मोठा विलंबित आणि एक द्रुत असे दोन ख्याल म्हणून एखाद्या रागाचे संपूर्ण स्वरूप ते प्रकट करीत. त्यानंतर प्राय:एखादी ठुमरी, त्यानंतर एखादे भजन किंवा नाट्यगीत किंवा दोन्ही होत असत. प्रायः मैफली रात्रीच होत असून रात्री दहाला सुरुवात झालेली मैफल साडेबारापर्यंत पूर्वार्ध ह्या स्वरूपात होई. नंतर मध्यांतर आणि त्यानंतर पुनः एकाच क्रमाने तीन-चार गानप्रकार होऊन भैरवीने मैफल संपे, तेव्हा पहाटेचे चार वाजू लागलेले असत. मात्र कंटाळून श्रोते निघून चालले आहेत, असे कधीच होत नसे. एका बाजूने तृप्ती तर दुसऱ्या बाजूने अतृप्ती अशा मिश्र अवस्थेतच मैफल संपे. त्या मैफलीतील स्वर कानांत इतके घुमत असत, की श्रोते जात असतानाही मनाने गाणे ऐकत जात असत. मृच्छकटिकातील चारुदत्ताप्रमाणेच जातानाही "गच्छामि शृण्वनिव" अशा प्रकारचा अनुभव श्रोत्यांना येत असे.

वर सांगितलेल्या भीमसेनजींच्या बाह्य वैशिष्ट्यांबरोबरच आणखी एक स्पष्ट आणि ठळक वैशिष्ट्य म्हणजे त्यांची शारीरिक हालचाल. ही हालचाल वयानुसार पुढे कमी झाली, तरी पूर्ण नष्ट झालीच नाही. परंतु सुरुवातीच्या कालखंडात ती विशेष जोरदार असे. बसल्या जागी आपले अर्धे पुढील शरीर जमिनीपर्यंत वाकवून ते ताना घेत असत. काही तानांच्या वेळी आपली एक मांडी पालथी घालून अर्धवीरासनात बसून ते काही ताना घेत. इतकेच नव्हे तर अधिक सुरुवातीला शरीराला एक झटका देऊनच ते पहिला स्वर लावीत. ह्या हालचालींवर (हातवाऱ्यांवर) सुरुवातीला काही टीकाकार आक्षेप घेत. पण नंतर हळूहळू त्यांची लोकप्रियता जसजशी वाढू लागली, तसतसा हा सर्व भाग अपरिहार्य म्हणून स्वीकारला गेला. गाताना "शुद्ध मुद्रा" ठेवावी हे म्हणणे तात्त्विक दृष्ट्या बरोबर असेल; पण जेव्हा गाण्यामध्ये काही कसरती, कवायती करावयाच्या असतील तेव्हा हा सर्व भाग अपरिहार्य असतो, स्वाभाविक असतो, हे श्रोत्यांकडून स्वीकारले गेले. ह्याउलट, "शुद्धमुद्रेने" गाणारे भीमसेन जोशी इतके प्रभावी गाऊ शकत नसत. त्यामुळे हातवारे करूनही असे गाता येत असेल, तर ते हातवारे क्षम्य आहेत हे मान्य केले गेले. ह्या सर्व हालचालींमुळे भीमसेन जोशींचे गायन चालू असता एखादा डोंबारी आपले खेळ करीत आहे आणि भोवतीचे सर्व प्रेक्षक त्याकडे थक्क होऊन पाहत आहेत, असे दृश्य अनेकदा दिसे. ऐन थंडीतही अशा हातवारेयुक्त गाण्यांनी भीमसेन जोशींच्या शरीरातून घामाच्या धारा वाहत आहेत, हे दृश्यही नेहमीच बघण्यास मिळे. पुढेपुढे वयोमानपरत्वे ह्या हालचाली कमी झाल्या. मात्र आणखी एक वैशिष्ट्य साधारणपणे त्यांच्या वयाच्या सत्तरीनंतर दिसू लागले ते म्हणजे ते गाताना मांडीवर शाल घेऊन गाऊ लागले. त्याचे कारण त्यांचे गुडघे दुखत असल्यामुळे तशी शाल घेणे त्यांना सोयीस्कर वाटू लागले. मात्र केवळ बाह्य गोष्टींचे अनुकरण करणारी काही गायक मंडळी स्वतःच्या तरुण वयातही शाल मांडीवर घेऊन हल्ली गाऊ लागली आहेत. खरे म्हणजे अशा प्रकारची शाल घेणे गाणाऱ्याच्या दृष्टीने

हालचालींवर मर्यादा आणणारे असल्याने गैरसोयीचे असते. पण बाह्य अनुकरणातच रमणाऱ्यांना हे कोण सांगणार?

ही सर्व बाह्य वैशिष्ट्ये सांगून झाल्यावर आता *गाण्याचा अंतरंगपरिचय करून देण्यास हरकत नाही.* भीमसेन जोशी त्यांच्या आयुष्यात वयाच्या चाळिशीपर्यंत काही मर्यादित रागच वारंवार गात असून मैफली प्रायः रात्री असल्यामुळे गाण्याची सुरुवात बहुधा शुद्ध कल्याण किंवा यमन ह्या रागाने होई. मग प्रायः "जादू भरेली" ह्या ठुमरीसारखी एखादी ठुमरी होई. पु. ल. देशपांडे ह्यांच्या "गुळाचा गणपती" ह्या चित्रपटात पार्श्वगायक म्हणून त्यांनी गायलेले "इन्द्रायणीकाठी देवाची आळंदी" हे ग. दि. माडगूळकर ह्यांचे पद ह्यानंतर होई. क्वचित एखादे "वद जाऊ कुणाला शरण....." किंवा "चंद्रिका ही जणू...", "दे हाता या शरणागता", "उगिच का कांता" ह्यासारखे नाट्यपद ह्यानंतर होई. किंवा मध्यांतरानंतर झालेल्या ख्यालगायनानंतरही गायले जाई. हे होईपर्यंत रात्रीचे १२ ते १२.३० झालेले असत त्यानंतर मध्यांतर होई. मध्यांतरानंतर प्रायः दरबारी कानडा किंवा मालकंस हाच राग होई. कधी पावसाळ्याचा ऋतू असेल, तर मिया मल्हार हा राग निश्चित होई. मध्यांतरानंतर पुनः एखादे नाट्यपद किंवा "मन हे रामरंगी रंगले" ह्यासारखे नाट्यपद आणि भजन असणारे गाणे होई. ह्याच वेळी मग भैरवी रागातील ठुमरी होऊन कार्यक्रम संपे. अपवादात्मक प्रसंगी कार्यक्रम सकाळी असेल, तर मिया की तोडी रागाने सुरुवात, इतर तपशील रात्रीच्या गाण्यातीलच पण मध्यंतरानंतर गौड सारंग हा राग आणि इतर तपशील रात्रीच्या गाण्यासारखेच होत. अगदी अपवादात्मक प्रसंगी संध्याकाळी कार्यक्रम असलाच तर सुरुवातीला "मुलतानी" आणि मध्यंतरानंतर पूरिया किंवा पूरिया-धनाश्री असे राग असत. एकदा एखादा राग घेतला, तर पंधरा-वीस मैफलींत एकामागून एक अनेक वेळा तोच राग गाऊन तो अधिकाधिक पक्का होत असे. त्यातील काही जागांची पुनरावृत्ती होत असे, तर प्रत्येक वेळी काही भाग उत्स्फूर्तपणे वेगळाच प्रकट होत असे. मैफलीतून, लोकांसमक्ष होणारा हा अभ्यास, हा सराव, रियाझ ह्याचे महत्त्व काही विलक्षण असे. त्यामुळेच तो राग इतका उत्तम गायला जाई, की त्यापुढे अन्य गायकांचे सर्व कार्यक्रम फिके वाटत असत. त्यामुळे काही ठरावीकच राग, तेच तेच राग, पुनःपुनः गाणारे गायक अशी त्यांच्यावर टीका होत असे. त्यांचे समकालीन पण दुर्दैवाने ज्यांना फारसे व्यावहारिक यश आणि धन ह्यांची प्राप्ती झाली नाही असे एक गायक "ते चार-पाचच चिजा लोकांच्या अंगावर फेकतात", अशी त्यांची निंदा करीत. खरे म्हणजे ती वस्तुस्थिती होती. परंतु तटस्थपणे पाहणाऱ्याच्या लक्षात हे येत असे, की त्याच त्या रागामध्ये प्रत्येक वेळा काही वेगळी रंगत आणि अवीटपणा होता. मुख्य म्हणजे तेच ते राग गाऊन त्या रागांवर एक प्रकारचे असामान्य प्रभुत्व येत असे. "आपल्याला जे येते; ते मैफलीत गायचे, आणि जे येत नाही; त्याचा घरी रियाझ करावयाचा", हे त्यांचे ह्याबाबतचे सूत्र होते. ते त्यांनी एका मुलाखतीत प्रकटही केले होते. वर सांगितलेल्या चौकटीमध्ये दर दहा वर्षांनी काही बदल होत गेले. मिया की तोडीच्या जागी गुजरी तोडी किंवा आसावरी तोडी, कधी ललत, कधी रामकली असे राग सकाळी ऐकू येऊ लागले. तसेच रात्रीच्या रागांमध्ये मारू बिहाग, केदार, दुर्गा, छाया, नटमल्हार, सूर मल्हार, सुहा-कानडा, अभोगी अशी भर पडली. संध्याकाळी भीमपलास, पुरीयाकल्याण, तिलककामोद अशा रागांची भर पडली.

१५ ऑगस्ट १९६७ ह्या दिवशी रात्री झालेल्या कार्यक्रमाची जाहिरात मुळी "अनवट रागांची मैफल", तसेच "तेच तेच राग" ह्या तक्रारीमुळे आयोजित केलेली वेगळी मैफल अशा प्रकारची होती. पुण्याच्या लक्ष्मी क्रीडामंदिरात झालेल्या ह्या कार्यक्रमाच्या वेळी भीमसेन जोशी पंचेचाळीस वर्षांचे होते. "जोश" आणि "होश" ह्यांचा सुवर्णमध्य असणारे ते वय होते. शारीरिक सामर्थ्य शंभरटक्के उत्तम होते. असंख्य मैफलींचा अनुभव, प्रसिद्धी हे सर्व गुण सिद्ध होते. अशा वेळी हा कार्यक्रम अविस्मरणीय होईल, ह्यात शंका नव्हती. नवे-जुने सर्व श्रोते हजर होते. त्या वेळी

त्यांनी मैफलीला सुरवात ललिताश्री ह्या रागाने केली. हा राग त्यांनी पूर्वी कधी जाहीर गायला होता की नाही हे माहित नाही, पुढेही कधी तो गायल्याचे कळले नाही. त्यांच्या इतर रागांच्या जशा वीस मिनिटांच्या ध्वनिमुद्रिका आहेत, तशी ह्या रागाची ध्वनिमुद्रिकाही नाही. हाच मुद्दा त्या दिवशी त्यांनी गायलेल्या बागेश्री-बहार, बागेश्री अंगाचा नायकी कानडा, सुहा सुघराई, भैरवभटियार ह्या रागांच्या बाबतीतही सांगता येईल. फार विचारपूर्वक आणि परिश्रमाने त्यांची ही मैफल अत्यंत श्रेष्ठ झाली. इतकी श्रेष्ठ, की "न भूतो न भविष्यति" हा वाक्प्रचार त्या दिवशीच्या कार्यक्रमाला शब्दशः लागू पडेल. पुढे ते अत्यंत वृद्ध झाले असता आणि गाणे संपलेले असताना त्यांना जणू शरपंजरी अशा अवस्थेत "भारतरत्न" ही पदवी देण्यात आली. पण माझ्यासारख्या सामान्य रसिकांच्या हृदयांनी त्या दिवशीच त्यांना भारतरत्न पदवी दिली. त्यापूर्वी आणि नंतर अनेकदा त्यांचे स्वर्गीय गायन मी ऐकले. पण हा दिवस केवळ अनन्यसाधारण होता. ह्या दिवशी त्यांनी "प्रेम सेवाशरण" हे मानापमानातील गाणेही म्हटले होते.

ह्या कार्यक्रमानंतर तीन-चारदा अशाच प्रकारे अनवट रागांचे काही कार्यक्रम झाले. त्यांतील एकाच कार्यक्रमास मी उपस्थित होतो. त्या दिवशी त्यांनी "जयजयवंती-नट" हा राग गायला. त्या रागाची ध्वनिमुद्रिकाही आहे. पण ह्या कार्यक्रमाला १५ ऑगस्ट १९६७ च्या कार्यक्रमाची उंची आली नाही, हे मात्र खरे.

त्यामुळे शेवटी मुख्य प्रश्न असा उपस्थित होतो, की भीमसेन जोशींच्या जवळ एकूण किती रागांचा संग्रह होता? त्यांच्या संगीताचा एकूण विस्तार किती? तो खरोखरीच चार-पाच रागांपुरताच मर्यादित होता का? माझ्या मते ह्या प्रश्नाचे उत्तर देताना दोन भाग वेगळे केले पाहिजेत. त्यांच्याजवळचा रागसंग्रह आणि प्रत्यक्षात कार्यक्रमात गायले जाणारे राग ह्यांची संख्या ह्यांत भेद केला पाहिजे. प्रत्यक्षात कार्यक्रमात रागांचे वैविध्य नसले, तरी एकूण त्यांच्याजवळ विस्तृत रागसंग्रह होता; आणि सुट्यासुट्या स्वरूपात त्यांनी कधीतरी गायलेले रागसुद्धा एकत्र केले, तर तो रागसंग्रह मोठाच होता, हे मी पुढे दिलेल्या रागांच्या यादीवरून लक्षात येईल. येथे जाताजाता हा मुद्दा नमूद करून ठेवला पाहिजे, की काही गायकांना पंडित, विद्वान असे म्हटले जात असले, तरी प्रत्येक घराण्यातील गायकांचे काही ठरावीक रागच वारंवार गायलेले ऐकू येतात. इतरांच्या तुलनेने जरी ते राग अनवट किंवा दुर्मीळ असले, तरी त्या त्या गायकांपुरते ते ते दहा-पंधरा रागच वारंवार गायले जातात. काही खरोखर विद्वान गायक खूप मोठा संग्रह करणारे असले, तरी ते प्रायः विद्वान, संशोधक ह्या प्रकारचे असतात; "कलावंत" ह्या प्रकारचे नसतात. ह्या सर्व पृष्ठभूमीवर मी भीमसेन जोशींकडून ऐकलेल्या रागांची मला आठवेल तशी यादी पुढीलप्रमाणे देत आहे - १) यमन, २) शुद्ध कल्याण, ३) केदार, ४) जलधर केदार, ५) दुर्गा, ६) शंकरा, ७) बिहाग, ८) मारू बिहाग, ९) ललिताश्री, १०) ललितागौरी, ११) वसंत, १२) वसंतबहार, १३) बहार, १४) शुद्ध बहार, १५) छाया, १६) मिया मल्हार, १७) गौड मल्हार, १८) नटमल्हार १९) छाया मल्हार, २०) मेघ मल्हार, २१) दरबारी कानडा, २२) सुहा कानडा, २३) बागेश्री अंगाचा नायकी कानडा, २४) कौशी कानडा, २५) मालकंस, २६) जोगकंस, २७) सूर्यकंस, २८) ललत, २९) रामकली, ३०) ललत भटियार, ३१) भैरवभटियार, ३२) हिंडोल, ३३) हिंडोलिता, ३४) हिंडोल बहार, ३५) सरपरदा बिलावल, ३६) वृंदावनी सारंग, ३७) गौड सारंग, ३८) भीमपलास, ३९) मुलतानी, ४०) पूरिया-धनाश्री, ४१) पूरिया, ४२) पूरिया कल्याण, ४३) मारवा ४४) मारवाश्री, ४५) कलाश्री, ४६) बागेश्री-बहार, ४७) मिया की तोडी, ४८) गुजरी तोडी, ४९) आसावरी तोडी, ५०) कोमल ऋषभ आसावरी, ५१) तिलककामोद, ५२) अभोगी, ५३) पूर्वा, ५४) जोगिया, ५५) भैरवी, ५६) जयजयवंतीनट, ५७) सूर मल्हार, ५८) जौनपुरी, ५९) चांदनी केदार, ६०) शिवरंजनी, ६१) सुहा सुघराई.

मी वरील राग सुमारे पन्नास वर्षांत ऐकले. त्यांतील काही राग अनेकदा ऐकले, तर काही एकदाच ऐकले. भीमसेन जोशींचे प्रत्येक गाणे मी ऐकले किंवा सर्व गाणे मला कळले किंवा लक्षात राहिले, असा

माझा दावा नाही. मी न ऐकलेले परंतु त्यांनी कुठेतरी गायलेले रागही काही असतील. पण एक गोष्ट मला स्पष्टपणे आणि नम्रपणे नोंदली पाहिजे, की ह्यांपैकी कोणताही राग गाताना त्यांचे त्या रागावर उत्तम प्रभुत्व आहे, असे जाणवले. कुठेही कच्चेपणा जाणवला नाही. सर्वच राग उत्तम रीतीने गळ्यावर चढलेले आहेत, असे जाणवले. भीमसेन जोशी किराणा घराण्याचे एक मुख्य गायक होते. मात्र किराणा घराण्याच्या अन्य गायकांमध्ये लोकप्रिय आणि वारंवार गायला जाणारा असा "अहीर भैरव" राग त्यांनी कधी गायल्याचे मी ऐकलेले नाही. ह्याउलट, जोगकंस रागासारखा जगन्नाथबुवा पुरोहित ह्यांच्यासारख्या आग्रा घराण्यातील प्रसिद्ध गायकाने निर्माण केलेला राग भीमसेन जोशी ह्यांच्या परंपरेत नसतानाही त्यांनी आत्मसात केला आणि काही वेळा गायला, हा मुद्दा लक्षणीय आहे. तसेच कलाश्री हा राग भीमसेन जोशींची स्वतःची निर्मिती होती. हा रागही अत्यंत रंजक पद्धतीने गायला जाई. एकच राग अनेक ठिकाणी, अनेक वेळा गायल्यामुळे तो राग भीमसेन जोशींच्या दृष्टीने आणि त्यांच्या श्रोत्यांच्याही दृष्टीने "साध्य" राग न होता "सिद्ध" राग होत असे. तात्पर्य, भीमसेन जोशींचा रागसंग्रह इतर गायकांइतकाच होता. तो थोडा मर्यादित होता, तेच तेच ते पुनःपुनः गात हे म्हणणे अर्धसत्य आहे. ह्या अर्धसत्याची दुसरी अर्धसत्य बाजूही विचारात घेतली पाहिजे, असे म्हणता येईल.

सामान्यतः प्रत्येक मैफलीत सुरुवातीला आणि मध्यांतरानंतर एकेक राग विस्तारपूर्वक गायला जाई. मधल्या काळात ठुमरी, नाट्यसंगीत, भजन ह्यांचा समावेश असे. ह्यांपैकी भजने ह्या प्रकाराचा स्वतंत्र विचार केला पाहिजे. सुरुवातीला इंद्रायणीकाठी हा एकच माडगूळकरांचा अभंग होता. पण पुढे त्यात तुकाराममहाराज, नामदेव, पुरंदरदास इत्यादी संतांची भजने ह्यांची वाढ होत गेली. ह्या भजनांना इतकी लोकप्रियता लाभली, की गेल्या शतकातील ऐंशीच्या दशकापासून पुढे त्यांचे "संतवाणी" असे केवळ संतांचे अभंग ह्यांचे गायन स्वतंत्रपणे सुरू झाले. विशेषतः अणुरणिया थोकडा, माझे माहेर पंढरी ह्यांसारखे अभंग इतके लोकप्रिय झाले, की त्यांनी ध्वनिमुद्रिकांच्या खपाचा उच्चांक गाठला. तुलनेने केवळ शास्त्रीय संगीताचा श्रोतृवृंद संख्येने कमी असतो. मात्र चित्रपट-संगीत, नाट्यसंगीत, भजने ह्यांचा श्रोतृवृंद खूप असतो. मराठी, कानडी आणि हिंदी ह्या तिन्ही भाषांतील संतांच्या रचनांचे लोकप्रिय गायक ह्या स्वरूपात भीमसेन जोशींची संगीताची कारकिर्द प्रदीर्घ आणि महत्त्वाची ठरली. त्यांच्या 'मिले सुर मेरा तुम्हारा' ह्या गीताने तर भारतातील सर्व भाषांच्या रसिकांपर्यंत त्यांची कीर्ती आणि लोकप्रियता पोचली. सुरुवातीला ते गातांना शब्दोच्चार स्पष्ट करीत नसत. पण संतवाणीतील सर्वच रचनांमधील त्यांचे शब्दोच्चार स्पष्ट आणि शुद्ध असणे हे त्यांच्या लोकप्रियतेचे आणखी एक कारण ठरते.

नाटक, चित्रपट, संगीत, साहित्य ह्यांसारख्या कलांच्या क्षेत्रात एक प्रश्न नेहमीच चर्चिला जातो; तो म्हणजे ह्या कलांच्या मूल्यमापनाचा निकष कोणता? काही चित्रपट अत्यंत लोकप्रिय असतात, पण विद्वानांचे त्यांच्याबाबत "गल्लाभरू" ह्या प्रकारचे मत असते. ह्याउलट, काही चित्रपटांना अनेक पारितोषिके मिळतात; पण त्यांना प्रेक्षक मिळत नाहीत. उलट, ज्यांना प्रेक्षक मिळत नाहीत, त्या चित्रपटांचे वर्णन "कलात्मक" असे केले जाते. चित्रपटाच्या क्षेत्रात "कलात्मक" आणि "व्यावसायिक" असे वर्गीकरण फार रूढ आहे. कमी-अधिक प्रमाणात हे वर्गीकरण अन्य कलाप्रकारांना लागू पडते. अभिज्ञानशाकुन्तल नाटकात कालिदासाचे एक प्रसिद्ध वाक्य आहे. तो म्हणतो, "आ परितोषाद् विदुषां न साधु मन्ये प्रयोगविज्ञानम्"। म्हणजे "विद्वानांच्या समाधानाशिवाय माझे प्रयोगविज्ञान चांगले आहे, असे मला वाटत नाही." म्हणजे विद्वानांचे समाधान हा कलेच्या मूल्यमापनातील एक निकष म्हणून कालिदासाने मानला आहे. शास्त्रीय संगीतातील अनेक चीजांमध्ये "गुणिजन" किंवा "विद्याधर" ह्यांचा उल्लेख येतो (उदा., खट रागातील "विद्याधर गुणिधर गुणिजन" ही चीज पहा). पण मला स्वतःला हा निकष योग्य वाटत

नाही. कारण मनुष्य जेवढा जास्त विद्वान, तेवढा तो जास्त पक्षपाती असतो. सामान्य प्रेक्षकाला कलावंताचा मूळ देश, भाषा, जात, धर्म, लिंग, स्वभाव ह्या गोष्टींची माहिती नसते. पण विद्वानांना ह्या सर्व गोष्टी माहीत असतात. त्या निकषांचा पारितोषिक-वितरणावरही परिणाम होतो. पण सामान्य श्रोत्याला हे मुद्दे माहीत नसतात. त्याला एखादी गोष्ट आवडते किंवा आवडत नाही. त्यामुळे सामान्य, अज्ञ जनांनी ज्याला स्वीकारले, ते खऱ्या अर्थाने श्रेष्ठ असते. रामायण, महाभारत ह्या महाकाव्यांची श्रेष्ठता ती सामान्य, अज्ञ माणसालाही आवडतात म्हणून आहे. नैषधं विद्वदौषधम् ह्यांसारख्या अनेक वाक्यांनी नैषधीयचरिताला विद्वानांनी श्रेष्ठ मानले असले (उदिते तु पुनर्हर्षे क्व माघः क्व च भारविः हे वाक्यही पहावे.), तरी सामान्य वाचकांना ते काव्य माहीत नसते. रामायण-महाभारताची लोकप्रियता अनेक शतके सर्वसिद्ध आहे. काही दिवसांपूर्वी त्यांच्यावर झालेल्या दूरदर्शनवरील मालिकांनी ती पुनः सिद्ध झालेली आहे. त्यामुळे कालिदासाच्या वाक्यात बदल करून आ परितोषाद् अविदुषाम्.... असे वाक्य लिहावेसे मला वाटते (म्हणजे "जोवर सामान्य अज्ञ माणसाला संतोष होत नाही तोवर माझ्या प्रयोगविज्ञानाबाबत मी समाधानी होणार नाही"). ह्याच निकषावर म्हणजे सामान्य, अज्ञ श्रोत्यांमध्ये असलेल्या लोकप्रियतेच्या आधारावर भीमसेन जोशींची श्रेष्ठता स्वीकारावी लागेल, असे मला वाटते. माझा एक मित्र संगीतात अत्यंत अरसिक अनभिज्ञ होता. तो इतर गायकांच्या गाण्याच्या वेळी उपस्थित राहत नसे. पण भीमसेन जोशींच्या गाण्याला तो माझ्याबरोबर कुठेही यावयास तयार असे. भीमसेन जोशींचे अनेक कार्यक्रम मी त्याच्याबरोबर रस्त्यावर बसून गणेशोत्सवाच्या वेळी ऐकले आहेत. सुरुवातीला अनेक वर्षे त्या काळातले दुढ्ढाचार्य भीमसेन जोशींना मान्यता देत नसत. पण त्यांची लोकप्रियता वाढतच गेली. अखेर ते विद्वान संपले, पण भीमसेन जोशी सर्वमान्य झाले. बालगंधर्वांबाबतही हेच म्हणता येईल (बालगंधर्वांविषयी अतिशय प्रतिकूल उद्गार आहिताग्नी राजवाडे ह्यांनी त्यांच्या आत्मचरित्रात काढले आहेत.). बालगंधर्वांचे गायनही ज्यांना संगीताची जाण नव्हती त्यांच्याकडूनही स्वीकार[illegible]ले. संगीत ही एक वैश्विक भाषा आहे. ती न समजणाऱ्यांवरसुद्धा परिणाम करते. अशा प्रकारच्या संगीतरूपी वैश्विक भाषेतील एक श्रेष्ठ कलावंत म्हणून भीमसेन जोशींची महानता सर्वमान्य आहे. तात्पर्य, लोकोत्तर "जोश" आणि "होश" ह्यांनी परिपूर्ण अशा समृद्ध तसेच वैविध्यपूर्ण गायकीमध्ये भीमसेन जोशींच्या लोकप्रियतेचे रहस्य आहे; तसेच ती असामान्य लोकप्रियता हे त्यांच्या श्रेष्ठत्वाचे गमक आहे.

❖❖❖

# इतिहासाचे लेखन आणि पुनर्लेखन

श्री. मा. भावे

भारतीय जनता पक्ष (भाजप) जेव्हाजेव्हा सत्तेवर आला –अशी गोष्ट १९९६, १९९८, १९९९ आणि २०१४ अशी चारदा झाली आहे – तेव्हातेव्हा विरोधकांनी अशी भीती व्यक्त केली की, या पक्षाची एक गुप्त विषय –पत्रिका आहे आणि त्या विषय–पत्रिकेवरील महत्त्वाचा कार्यक्रम त्या पक्षाला आणि एकंदरच संघ-परिवाराला भारताच्या इतिहासाचे जे आकलन झाले आहे, ते आकलन सर्व भारतीयांच्या गळी उतरवण्याचा आहे. हा कार्यक्रम गुप्त ठेवण्याचे कारण, विरोधकांच्या मते, असे आहे की, संघपरिवाराने इतिहासाचे जे आकलन स्वीकारले आहे ते उघडपणे मांडले, तर त्या आकलनापासून निर्माण होणारे धोके लोकांच्या लक्षात येतील आणि सरकारच्या या कार्यक्रमाला प्रचंड विरोध होईल. त्यामुळे भाजपचे सरकार हा कार्यक्रम हलकेहलके व पायरीपायरीने, त्याचा फारसा बोभाटा होऊ न देता, अमलात आणणार आहे.

खरे पाहिले तर भारतीय इतिहासाचे संघपरिवाराला मान्य असलेले आकलन काही गुप्त राहिलेले नाही. परिवाराचे प्रवक्ते, परिवाराची नियतकालिके यांनी ते वारंवार लोकांपुढे मांडलेले आहे. परिवारातील काही संस्थातर या आकलनाशी मेळ बसणारे इतिहास लिहिण्यातही गुंतल्या आहेत. या इतिहासकारांचे म्हणणे असे आहे की, आजवर भारताचा इतिहास परकीय इतिहाससंशोधकांनी त्यांच्या सोयीनुसार लिहिला. त्यामुळे त्यांच्या इतिहासाच्या प्रतिपादनात–भारतीय दृष्टीने पाहिले तर–अनेक विकृती आढळतात. त्या विकृतींचा परिणाम असा होतो की, भारतीय समाजात नाना तऱ्हेची दुही व भांडणे उभी राहतात. भारतीयांच्या दृष्टिकोणातून इतिहासाचे लेखन जेव्हा होईल, तेव्हा भारतीयांत फाटाफूट पाडण्यास कारणीभूत होणाऱ्या विकृती त्यात असणार नाहीत. असा इतिहास लिहिण्यासाठी जो लेखकवर्ग तयार झाला आहे, त्यात काही नावाजलेले विद्वानही आहेत.

परकीयांनी लिहिलेल्या इतिहासातील संघपरिवाराच्या दृष्टीने आक्षेपार्ह असलेला एक भाग म्हणजे आर्य हे बाहेरून आले व त्यांनी हिंदुस्थानावर आक्रमण केले, हा होय. मॅक्स म्युलर व वेदांचा अभ्यास करणारे पाश्चात्त्य संशोधक यांनी वेदांतील उक्तींचा चुकीचा अर्थ लावून आर्य आक्रमक म्हणून हिंदुस्थानात आले व येथील मूलवासीयांना त्यांनी रेटत दक्षिणेकडे जायला भाग पाडले, असा निष्कर्ष काढला. पुढे मोहेंजोदाडो व हडप्पा ही शहरे उत्खननात सापडली व त्यात एके ठिकाणी तेथील नागरिकांच्या प्रेतांचा ढीग आढळला. हे उत्खनन करणारा पंडित मॉर्टिमर व्हीलर याने 'इन्द्रा स्टॅण्ड्स ॲक्यूज नावाचा शोधलेख लिहून इन्द्र या आर्यांच्या नायकाने ह्या शहरांचा विद्ध्वंस केला, असा विचार मांडला. अशा इतिहासलेखनातून आर्य विरुद्ध द्रविड, उत्तर भारतीय विरुद्ध दक्षिण भारतीय, ब्राह्मण विरुद्ध दलित असे संघर्ष उभे राहतात. खरेतर आर्य हे भारतीय समाजातील उच्चस्तरीय लोकांनी स्वतःला लावून घेतलेले आदरार्थी नाव होते. ते कुठून बाहेरून आलेले नव्हेत. उत्खननात जी प्रेते सापडली त्यांची 'कार्बन डेटिंग' चाचणी केली, तेव्हा ती प्रेते वेगवेगळ्या काळांतली होती, असे आढळून आले आहे. म्हणून कोण्या आक्रमकाने एकाच हल्ल्यात हे बळी घेतले, असे मानणे चूक आहे. हिंदुस्थानाच्या प्राचीन इतिहासातील एका प्रसंगाचा संघपरिवाराला मान्य असणारा तर्जुमा हा असा आहे. हे केवळ एक उदाहरण दिले. त्याखेरीज सरस्वती नदी व तिच्या काठची संस्कृती इ. इतर मुद्दे आहेतच.

संघपरिवाराचे जे विरोधक आहेत त्यांचा, संघाने स्वतः ला जो खरा इतिहास वाटतो तो लोकांपुढे मांडायला विरोध असण्याचे काही कारण नाही. त्यांचा विरोध आहे तो भाजपने सत्तेवर आल्यावर त्या सत्तेचा उपयोग आपल्या विचारांचा प्रसार करण्यासाठी करण्याला. केंद्र सरकारच्या अखत्यारीत 'भारतीय इतिहास संशोधन परिषद'

अनुक्रमणिका

(आय.सी. एच. आर) आणि 'राष्ट्रीय शिक्षण संशोधन आणि प्रशिक्षण परिषद' (एन.सी.ई.आर.टी.) या दोन संस्था आहेत. देशातील अभ्यासकांच्या इतिहासाच्या संशोधनातील प्रकल्पांना अर्थसाहाय्य करण्याची जबाबदारी पहिल्या संस्थेची आहे. दुसऱ्या संस्थेच्या कामांपैकी एक महत्त्वाचे काम म्हणजे पाठ्यपुस्तके तयार करण्याचे. आताच्या आपल्या विषयाच्या दृष्टीने लक्षात घेण्याची बाब म्हणजे ही संस्था तयार करीत असलेली इतिहासाची पाठ्यपुस्तके. भाजपविरोधकांचा सध्याचा रोख या दोन संस्थांवर पदाधिकारी म्हणून ज्यांची नेमणूक केंद्रसरकारने केली आहे, त्यावर आहे. विरोधकांचे म्हणणे असे की, या संस्थांवर ज्यांची नेमणूक झाली आहे, त्या व्यक्ती संघपरिवाराच्या विचारांवर निष्ठा ठेवणाऱ्या आहेतच; पण संशोधनातील त्यांची कामगिरी आंतरराष्ट्रीय दर्जाची नाही. या महत्त्वाच्या संस्था अशा सुमार दर्जाच्या व संघपरिवाराला मान्य असणाऱ्या विपरीत इतिहासदृष्टीशी निष्ठा बाळगणाऱ्या लोकांच्या हाती गेल्यामुळे देशातील इतिहाससंशोधन व इतिहास-अध्यापन या दोहोंवर घातक परिणाम होईल.

ह्या सर्व वादाची पृष्ठभूमी सत्ताकारणाची आहे, हे उघड आहे. सत्ताकारण दोन स्तरांवरील आहे. पहिले, विरोधी पक्षीयांना सरकारला कायम टीकेच्या पिंजऱ्यात ठेवायचे असते. बाजपेयींचे सरकार युतीचे सरकार होते. भाजपच्या छुप्या विषयपत्रिकेची भीती दाखवून युतीतील इतर पक्षांना भाजपची संगत सोडायला लावण्यासाठी असे वाद चालवणे फायद्याचे होते. सध्याच्या भाजप सरकारकडे स्वतःचे बहुमत आहे. त्यामुळे युतीतील पक्षांनी सरकारला सोडले तरी सरकार पडण्याची भीती नाही. तरीही अशा तऱ्हेचे वाद उकळवत ठेवणे विरोधी पक्षांना, संघपरिवाराशी तात्त्विक व मूलभूत मतभेद असणाऱ्या विचारवंतांना आणि माध्यमधुरिणांना उपयोगाचे वाटते. दुसरा स्तर म्हणजे विद्यापीठीय पंडितांचा. 'आय. सी. एच. आर.' किंवा 'एन. सी. ई. आर. टी.' अशा संस्थांवर नेमणूक होणे हे मानाचे तर आहेच; पण तो पोशिंदेपदावर पोचण्याचा एक मार्ग आहे. आपले विद्यार्थी, मित्रमंडळी अशांचे आणि आपल्या अखत्यारीतील संस्थांचे संशोधनप्रकल्प मान्य करून घेणे, त्यासाठी अर्थसाहाय्य पुरवणे, निरनिराळ्या चर्चासत्रांत त्यांची वर्णी लावणे या गोष्टी अशा संस्थांची अधिकारपदे मिळाल्यावर सहज करवून घेता येतात. नवीन आणि इतिहासाची निराळी समज असलेले सरकार सत्तेवर आल्यावर ज्यांनी पूर्वी या संस्थांवर अधिकार गाजवले, त्यांना आपली पदे सोडावी लागणार, हे ओघानेच आले. त्यातून काहीसा 'हृदयदाह' निर्माण होणे साहजिकच होय.

समाजातील बहुतेक लोकांचा इतिहासाशी असलेला संबंध दहावी उत्तीर्ण होताच संपतो. सरकारी नोकऱ्यांसाठी ज्या स्पर्धापरीक्षा होतात, त्यांत गुण मिळविण्यासाठी इतिहासविषयाचा उपयोग होतो म्हणून अलीकडे इंजिनियर किंवा डॉक्टर झालेल्या व्यक्तीदेखील त्या परीक्षेपुरता सदर विषयाचा नव्याने अभ्यास करतात. शाळेतही इतिहासात रुची घेणारा विद्यार्थी क्वचितच आढळतो. (मी गुणवत्ताधारक विद्यार्थ्यांच्या शिष्यवृत्तीसाठी मुलाखती घेत असल्याने हे मला साक्षात माहीत आहे.) साहजिकच विरोधी पक्षीय व भाजप यांच्यात इतिहासावरून चाललेल्या वादात चिकित्सापूर्वक लक्ष घालणारी माणसे अगदीच थोडी. बऱ्याच जणांना असे वाटते की, इतिहास जर वस्तुनिष्ठ असेल, म्हणजे उदा., 'पानिपतावर मराठ्यांचा पराभव झाला', तर इतिहासासंबंधी वाद होण्याचे कारणच काय? एकाच हकिकतीची दोन-तीन किंवा जास्त निवेदने होऊच कशी शकतात? इतिहासाचे जाणकार त्यांची आपसात चर्चा करून एकच एक प्रमाण निवेदन तयार करू शकत नाहीत का? आणि एकदा असा प्रमाण इतिहास तयार झाल्यावर त्याची पुनःपरीक्षा व पुनर्लेखन करण्याचे कारण काय?

(१)

'इतिहास' या संस्कृत शब्दाचा अर्थ 'झालेल्या प्रसंगाचे निवेदन' असा होतो. पण हल्ली आपण तो शब्द 'झालेला प्रसंग' आणि 'त्या प्रसंगाविषयीचे निवेदन' या दोन्ही अर्थांनी वापरतो. ही गोष्ट खरीच आहे की, 'घडून गेलेला प्रसंग' आपल्यापर्यंत पोचतो तो निरनिराळ्या निवेदनांच्या द्वारेच. (इथे 'निवेदन' हा शब्द केवळ 'भाषेतून सांगितलेले' इतक्याच मर्यादित अर्थाने वापरलेला नाही. प्रसंगाचे चित्र, छायाचित्र, दृश्यफीत, एखादी वस्तू ही-देखील जर 'त्या प्रसंगाविषयी आपण काही सांगतो आहोत',

असा दावा करीत असतील, तर ती सर्व 'निवेदने'च म्हणावी लागतील). थोडक्यात म्हणजे 'इतिहास' या शब्दात 'होऊन गेलेली घटना' आणि 'त्या घटनेविषयीची निवेदने' या दोन्ही गोष्टींचा समावेश होतो. या दोन्हींचा परस्परांशी मेळ घालण्याचे काम वाचकाला करावयाचे असते.

हा 'मेळ' घालायचा म्हणजे काय करायचे? 'मूळ घटना', 'तंतोतंत' किंवा 'हुबेहूब' कशी झाली असेल, हे तर वाचकाला माहीत असणे शक्यच नाही. तो स्वतः त्या घटनेचा एक अंश असला, तरीही हे त्याला माहीत नसते. त्याचप्रमाणे जी निवेदने आपणासमोर येतात, तीही परस्परविरुद्ध असू शकतात याविषयीच्या दोन गोष्टी उदाहरणादाखल लिहितो.

कवी केशवसुत (कृष्णाजी केशव दामले) हे १९०५साली वारले. त्यांच्या मृत्यूच्या तारखेचा शोध नाट्यछटाकार दिवाकर (शंकर काशिनाथ गर्गे) हे १९१५ साली घेऊ लागले. केशवसुतांच्या सर्व कविता एकत्र करून काव्यसंग्रह काढावा, असा दिवाकरांचा विचार होता. त्या काळी 'काव्यरत्नावली' नावाचे मासिक निघत असे. त्यावरून असे दिसून आले की, केशवसुत ७ नोव्हेंबर १९०५ या तारखेला वारले. केशवसुतांचे बंधू सीतारामपंत दामले तेव्हा 'न्यू इंग्लिश स्कूला' त शिक्षक होते. ते म्हणाले, "केशवसुत २ नोव्हेंबर १९०५ ला वारले, हे मला पक्के ठाऊक आहे. ते धारवाडला आजारी असल्याची तार आल्याने मी धारवाडला पोचलो ती २ नोव्हेंबर ही तारीख होती. मी पोचलो तो केशवसुत वारलेच होते. मी स्वतः त्यांना अग्नी दिला.' अशा रीतीने एकाच घटनेविषयी ही दोन निवेदने पुढे आली. एक प्रत्यक्षदर्शी साक्षीदाराचे तर दुसरे त्याच वेळच्या एका मासिकातून आलेले. नंतर दिवाकर, कवी गिरीश आणि कवी माधव ज्युलियन यांनी शोध घेतला. धारवाड नगरपालिकेकडून मृत्यूची नोंद मागवली. ती ७ नोव्हेंबर अशीच होती. अधिक मनोरंजक गोष्ट म्हणजे सीतारामपंत दामल्यांनी रजा केव्हा घेतली होती, याचा शोध त्यांनी 'न्यू इंग्लिश स्कूल' च्या दफ्तरातून घेतला. तेव्हा असे दिसून आले की, सीतारामपंतांनी ५ नोव्हेंबरला रजा घेतली. सारांश, प्रत्यक्षदर्शी साक्षीदाराची आठवण चुकीची ठरली.

१९६२ साली भारत व चीन यांच्यात भारताच्या उत्तरसीमेवर लढाई झाली. लद्दाख आणि (आताचा) अरुणाचल प्रदेश अशी दोन युद्धक्षेत्रे होती. अरुणाचल प्रदेश व तिबेट यांच्या सरहद्दीवर वायव्येकडील धोला या ठिकाणापासून आग्नेयेकडील बोम्डिला पर्यंत भारतीय सेनेच्या ५ चौक्या (किंवा सैन्यछावण्या) पसरलेल्या होत्या. सैन्याची (चौथी डिव्हिजन) मुख्य छावणी दिरांग (किंवा दिरांग-झाँग) या ठिकाणी होती. तेथे सैन्याचे मुख्य मेजर जनरल ए. एस. पठाणिया यांचे ठाणे होते. या मुख्य ठाण्याच्या दक्षिणेला काही अंतरावर डिव्हिजन मधील ६५ व्या ब्रिगेडची छावणी होती व तिचे मुख्य ब्रिगेडियर चीमा हे होते. या ब्रिगेडच्या छावणीत जे.आर.सैगल हे मेजरपदावरील अधिकारी होते.मुख्य छावणी आणि ६५ व्या ब्रिगेडची छावणी मिळून साडे-चार हजार सैन्य होते. त्यांच्यापाशी पुरेसा दारूगोळा, खाद्यसामग्री तर होतीच, पण रणगाडेही होते. शत्रूकडे रणगाडे नव्हते.

दिरांगमध्ये अशा रीतीने दोन छावण्या होत्या. तेथे १८ नोव्हेंबर १९६२ च्या सकाळी काय झाले, याचे निवेदन मेजर सैगल यांनी १९७९ साली लिहिलेल्या 'दी अन्फॉट वॉर ऑफ १९६२' या पुस्तकात दिले आहे. त्यांनी म्हटले आहे की, 'दिरांग आणि बोमदिला या रस्त्यावर चिनी सैन्याच्या एका तुकडीने एके ठिकाणी ठाणे मांडून रस्ता बंद केल्याची बातमी आली होती. पण डिव्हिजनच्या मुख्य छावणीतून एक तुकडी पाठवून तो अडथळा दूर करता आला असता. आमच्या कोणाच्या दृष्टिपथातही चिनी सैन्य आले नव्हते किंवा गोळीबाराचा आवाजही ऐकू आला नव्हता. पहाटेच ब्रिगेडचे सेनापती ब्रिगेडियर चीमा हे डिव्हिजनच्या मुख्य कचेरीत गेले होते. ते परत आले, तेव्हा हातवारे करीत ते ओरडत होते की, 'पळा, पळा, मंडाला...' नंतर चीमा एका जीपमध्ये बसले व निघून गेले. (मंडाला हे दिरांगच्या दक्षिणेला बऱ्याच अंतरावर असणारे ठिकाण होते.) थोड्याच वेळात ब्रिग्रेडची छावणी फुटली आणि पळापळ झाली. डिव्हिजनच्या छावणीचे मुख्य मेजर जनरल पठाणिया यांनीही एका जीपमधून दक्षिणेकडे पळ काढला.

हाताखालील सैन्याला माघारीचे आदेशही या सेनापतींनी दिले नाहीत. यानंतर डिव्हिजनची छावणीही सोडून देण्यात आली. फाटाफूट झाली.' (पान ७३-७४)

या निवेदनाच्या बरोबर उलट माहिती देणारे निवेदन मेजर जामवाल वार्ताहरांना देत होते, हेही मेजर सैगल यांनीच सांगितले आहे. दिरांगहून पळून गेलेले सैनिक व अधिकारी फार मोठ्या आपत्तींना तोंड देत चारद्वार नावाच्या ठिकाणी आले. तेथे मेजर जामवाल पत्रकार परिषदा घेऊन सांगत होते की, 'आमच्या चौक्यांवर चिनी सैनिकांच्या मोठ्या समुदायाने हल्ला केला. त्या सैन्याच्या झुंडीमागून झुंडी चौक्यांवर हल्ले करत होत्या. आम्ही रणगाड्यांच्या सहाय्याने चिन्यांच्या अनेक तुकड्यांना तुडवून टाकले. पण चिन्यांचे बळ जबरदस्त असल्याने आमचे रणगाडे आम्हीच नष्ट केले व माघार घेऊन आलो.' (पान ९७) मेजर सैगलांचे यावर भाष्य असे आहे की, भरपूर दारूगोळ्याचा साठा असलेले रणगाडे चांगल्या स्थितीत सैनिकांनी सोडून दिले होते व ते आम्ही पाहिले होते.

मेजर सैगल व मेजर जामवाल हे दोघेही १८ नोव्हेंबर १९६२ ला घडलेल्या हकीकतीचे प्रत्यक्षदर्शी साक्षीदार आहेत. पण दोघांच्या निवेदनांत इतकी मोठी तफावत आहे. या निवेदनांवरून त्या हकीकतीचे कोणते चित्र आपण तयार करायचे? कवी केशवसुत यांच्या मृत्यूची तारीख ठरवणे ही किरकोळ गोष्ट होती. सीतारामपंत दामले जाणूनबुजून खोटी माहिती देत आहेत, असा संशय घ्यायला जागा नव्हती. पण चीनशी झालेली लढाई ही फार महत्त्वाची घडामोड होती. (त्या वेळच्या) नेफा (आताचा अरुणाचल प्रदेश) भागातून भारतीय सैन्याला घ्याव्या लागलेल्या माघारीची नामुष्की अजूनही सामान्य नागरिकाला अस्वस्थ करीत असते. त्या वेळी मोठ्या अधिकारावर कामे करीत असलेल्या दोघा प्रत्यक्षदर्शींच्या या निवेदनांमुळे वाचक भ्रांत होईल व आपल्या मनाच्या कलाप्रमाणे भारतीय सैन्य व ती लढाई यांच्याविषयी आपला निवाडा तयार करील.

वाचक जर भारतीय सैन्याचा अभिमानी असेल, तर त्याचा निवाडा मेजर जामवाल यांच्या बाजूचा असेल. तो असा विचार करील की, 'नेहरू-मेनन यांना चीनशी लढाई होईल, असे वाटतच नव्हते. त्यांनी सैन्याच्या साधन-सामग्रीची पुरेशी काळजी घेतली नाही, अशी सर्वत्र समजूत होतीच. जी काही सामग्री होती तिचा आमच्या जवानांनी व सेनानींनी उत्तम उपयोग करून चिन्यांना शर्थीने तोंड दिले असणार, यात शंका नाही. दारूगोळा व अन्न संपल्यावर जवान बिचारे काय करतील? शरण जाऊन युद्धकैदी होण्यापेक्षा माधार घेऊन परत येणे त्यांनी पसंत केले.' याउलट, वाचक जर संरक्षण-खात्यावर विश्वास ठेवणारा असेल, तर तो असा निवाडा करील की, 'चिनी आक्रमणाची घटना बरोचशी अनपेक्षित होती. तरीही संरक्षण-खात्याने जवानांना व सेनाधिकाऱ्यांना पुरेशी रसद न पुरविता अगणित अशा चिनी सैन्यासमोर बळी देण्यासाठी उभे केले असेल, हे संभवत नाही. धोला, दिरांग येथील आपल्या छावण्या मजबूत होत्या. तेथे धान्य व दारूगोळा यांचा तुटवडा नव्हता. धोला-दिरांग-[illegible]ला हा रस्ता तयार होता. जीपने त्यावरून वाहतूक होत होती. तथापि, सेनापतींमध्येच परस्परांविषयी अविश्वास होता. माधार घेण्याकडेच उच्चाधिकाऱ्यांचा कल होता. त्यावरून मेजर सैगल यांनी दिलेली हकिकतच विश्वास ठेवण्यालायक वाटते!'

हे दोन्ही निवाडेदेखील भारत-चीन लढाईविषयींची निवेदनेच होत! भूतकाळातील घटितांविषयीच्या निवेदनांची चळत अशी वाढतच असते. साहजिकच, असे विचारावे लागते की, मूळ घटितांचे हुबेहूब व वस्तुनिष्ठ वर्णन करणे शक्य आहे का? आणि समजा, कुणी असे वर्णन केले असले तरी ते यथातथ्य वर्णन आहे, याचा पडताळा कसा घेणार? तेव्हा या बाबतीत दोनच गोष्टी समंजसपणाच्या वाटतात. पहिली अशी की, सर्वच निवेदने कोणत्या ना कोणत्या दृष्टिकोणातून घटिताचे जास्तीत जास्त यथातथ्य किंवा वस्तुनिष्ठ वर्णन करण्याच्या प्रयत्नात असतात; पण प्रत्येक वर्णन हे वस्तुनिष्ठतेपासून कमीजास्त प्रमाणात दूर गेलेले असते, हे मान्य करणे व या विषयात शक्य तितकी सहिष्णुता दाखवणे. दुसरी ही की, आपल्या वर्तमानकालीन गरजांच्या संदर्भात कोणत्या तरी निवाड्यावर शक्य तितकी सहमती निर्माण करणे.

(२)

हा जो दुसरा तोडगा सांगितला, त्याचीही अनेक

मनोरंजक व उद्‌बोधक उदाहरणे संबंधित साहित्यात पाहावयास मिळतात. (ही उदाहरणेदेखील घटिताची निवेदनेच असल्याने वर दिलेले प्रश्न त्यांच्याही बाबतीत उद्‌भवतातच.) त्यांतील पहिले उदाहरण रोमच्या इतिहासातील होरेशस या वीरपुरुषाचे. रोमच्या इतिहासाचे कथन करणारे प्राचीन ग्रंथकार प्लुटार्क (याचा काळ इ. स. पू. ४६ ते पू. १२० या दरम्यानचा असावा.) आणि लेव्ही (इ. स. पू. ५९ ते इ. स. १७) या दोघांनीही होरेशसच्या पराक्रमाचे वर्णन केले आहे. असे सांगतात की, इ. स. पू. ५०९ या वर्षी रोमशहरातील राजेशाही बरखास्त करून तेथे प्रजासत्ताक स्थापण्यात आले. त्या वेळी पोर्सेना नावाच्या, दुसऱ्या ठिकाणच्या, राजाने रोमवर स्वारी केली. रोमजवळ टायबर नावाची नदी आहे. नदीच्या एका तीरावर रोम वसले होते व पोर्सेनाचे सैन्य पैलतीरावर होते. नदीवर एक अरुंद लाकडी पूल होता. होरेशस नावाचा योद्धा आपल्या दोन सहकाऱ्यांबरोबर त्या पुलावर उभा राहिला व त्याने पोर्सेनाचे सैन्य अडवून धरले. त्याच वेळी रोमन लोक तो लाकडी पूल कुऱ्हाडीने तोडून शत्रूचा मार्गच खंडित करण्याच्या खटपटीला लागले होते.

सुरू झालेल्या घमासान लढाईत होरेशसचे दोन्ही जोडीदार मारले गेले. पण होरेशस पूल लढवतच होता आणि समग्र शत्रुसैन्याचा प्रतिकार करत होता. इतक्यात पूल तुटला आणि होरेशसने टायबर नदीत उडी मारली. एक कथा सांगते की, होरेशस पोहत रोमला परतला तर दुसरी सांगते की, होरेशस नदीतच शत्रूकडून मारला गेला. हा मतभेद वगळला तरी होरेशस हा वीरपुरुष होता व त्याने शत्रूला अडवले, यावर इतिहासकारांची सहमती होती. फक्त डायोनिशियस (इ.स.पू. १ ले शतक) या ग्रीक इतिहासकाराने असे लिहिले होते की, पोर्सेनाने रोमचा पराभव केला, रोम काबीज केले व नंतर ५० वर्षे रोम परकीय अमलाखाली होते.

होरेशसची कथा रोमच्या इतिहासात फार गाजली. त्याच्या पराक्रमाची वर्णने नंतरही वेगवेगळ्या लेखकांनी आपापल्या परीने उत्कट पद्धतीने रंगवली. १९ व्या शतकात मेकॉले (हिंदुस्थातील कायद्यांच्या संहिता करणारा व इंग्रजी शिक्षणाची तरफदारी करणारा विद्वान मनुष्य. काळ- इ.स.१८०० ते १८५९) याने 'लेज ऑफ एन्शन्ट रोम' या पुस्तकात रोमच्या इतिहासातील प्रसंगांवर कविता लिहिल्या. त्यांत होरेशसवर एक नावाजलेली कविता लिहिली. हिचे मराठी भाषांतर (बहुधा 'अज्ञातवासी' यांनी केलेले.) 'निराशा शूराच्या कधीही हृदया स्पर्श न करी' या पालुपदाने, एके काळी, बरेच प्रसिद्ध होते. असो.

मुद्दा असा की, होरेशससंबंधी लिहिणारे जुन्यांत जुने इतिहासकार पोर्सेनाच्या रोमवरील आक्रमणानंतर सुमारे पाचशे वर्षांनी झाले. म्हणजे त्यांच्यापर्यंत होरेशसच्या पराक्रमाची कथा मौखिक परंपरेने पोचली असणार. पोर्सेनाच्या आक्रमणाच्या प्रसंगात रोमच्या मुलांनी व स्त्रियांनीदेखील जे पराक्रम केले, त्यांच्याही गोष्टी सांगितल्या जातात. डायोनिशियसने मात्र (कदाचित डायोनिशियस हा ग्रीक असल्यामुळे त्याने रोमच्या गौरवाच्या कथांकडे अलिप्तपणे पाहिले असेल.) पोर्सेनाने रोम जिंकल्याचा उल्लेख केला. आत्ताच्या अभ्यासकांचे मत असे आहे की, रोमचे प्रजासत्ताक राज्य स्थिरस्थावर झाल्यावर लोकांनी होरेशस या महावीराच्या दंतकथेला इतिहासाचे रूप दिले असावे. अशी आत्मगौरवी कथा ही इ. स. पू. तिसऱ्या किंवा चौथ्या शतकातील रोमन लोकांना स्वतःच्या अहंकार कुरवाळण्याला उपयोगी वाटली असेल. (निकोलस डर्क्स याच्या 'द कास्ट्स ऑफ दी एम्पायर' या पुस्तकाच्या सुरुवातीलाच काळाची गरज म्हणून इतिहास कसा रचला जातो हे सांगताना होरेशसच्या कथेची माहिती दिली आहे.)

मराठी इतिहासातील सेनापतींनी शत्रुस्त्रियांना दाक्षिण्याने वागविल्याच्या कहाण्या प्रसिद्ध आहेत. शिवाजी-राजांनी कल्याणचा सुभा जिंकून घेतला, तेव्हा तेथील सुभेदाराची सून सैनिकांनी राजांकडे पकडून आणली होती. 'आमच्या मातोश्री अशा सुंदर असत्या तर आम्हीही सुंदर झालो असतो', असा उदात्त उद्‌गार काढून राजांनी त्या सुनेचा सत्कार केला, असे सांगतात. प्रसिद्ध लेखक पु. भा. भावे यांनी या प्रसंगावर अतिशय वक्तृत्वपूर्ण व ओजस्वी लेखही लिहिला होता. तथापि, तत्कालीन कागदपत्रांचे अभ्यासक असे सांगतात की, असा कोणताच उल्लेख कागदोपत्री नाही. तेव्हा शिवाजीराजांच्या

स्त्रीदाक्षिण्याचे कौतुक करणारा हा प्रसंग उत्तरकालीन लेखकांनी रचला असावा.

तीच गोष्ट चिमाजीअप्पांनी साडी-चोळी देऊन आदरपूर्वक नवऱ्याकडे पोचत्या केलेल्या पोर्तुगीज स्त्रीची. 'धनुर्धारी' या नावाने लेखन करणाऱ्या टिकेकर यांनी मोडी लिपीत छापलेले एक पुस्तक १८९३ साली प्रसिद्ध केले. त्यांनी अशी कथा दिली आहे की, वसईतील पोर्तुगीज सैन्याच्या सेनापतींची बायको मराठी सैन्याच्या तुकडीला सापडली. त्या तुकडीने सदर स्त्रीला आपले सेनापती चिमाजीअप्पा यांच्याकडे नेले. तेव्हा चिमाजींनी तिचा सत्कार करून किल्ल्यात पोचते केले. नंतर ती बाई नवऱ्याला म्हणाली की, 'अशा थोर व उदारचरित शत्रूशी लढून आपली नासाडी करून घेणे चुकीचे आहे. तुम्ही किल्ला शत्रूच्या हवाली करावा!'. अशा रीतीने किल्ला मराठ्यांच्या ताब्यात आला. हा प्रसंगदेखील दंतकथाच आहे.

एकोणिसाव्या शतकाच्या अखेरीला महाराष्ट्रात स्वातंत्र्याची आकांक्षा निर्माण झाली. इतिहासाचे एक गौरवपूर्ण चित्र मराठी मनुष्य रंगवू लागला. शिवाजी-उत्सव सुरू झाला. आपण एके काळी स्वतंत्र होतो. स्वतः राज्य चालवत होतो, ते राज्य प्रजेचे हित जपणारे व प्रजाजनांचाच नव्हे तर शत्रूचाही शिष्टाचारयुक्त मान राखणारे होते, असे लोकांच्या मनावर ठसविण्यासाठी अशा गोष्टी रचून सांगण्यात आल्या. इतिहासाचे निवेदन दर पिढी आपल्या हितसंबंधांना अनुसरून तयार करीत असते.

(३)

आतापर्यंत आपण होऊन गेलेली (किंवा जिच्याविषयी ती घडून गेलेली आहे असा दावा केला जातो अशी) घटना आणि तिच्याबद्दलची निवेदने यांचा विचार केला. होऊन गेलेला प्रसंग त्याच्याबद्दलच्या वेगवेगळ्या निवेदनांची सांगड घालून हुबेहूब उभा करण्याचे काम इतिहासकाराने करावयाचे असते. एखाद्या अपघाताच्या किंवा खुनाच्या खटल्याचा निवाडा करणारा न्यायाधीश आणि सदर इहिसकार यांच्या कामांत फारसा फरक नाही. न्यायाधीशाला निवाडा करण्याचा वैधानिक अधिकार असल्याने त्याचा निवाडा पटला नाही, तरी मान्य केला जातो; इतिहासकाराच्या निवाड्याला तशी वैधानिक मान्यता नसते. तरीही त्याची प्रगल्भता, नाना प्रकारची निवेदने पारखून घेण्याचा त्याचा अनुभव, त्याच्या पूर्वीच्या निवाड्यांना इतर इतिहासकारांकडून मिळालेली पसंती इत्यादिकांच्या योगाने इतिहासकाराने दिलेला निवाडा, म्हणजेच विवाद्य प्रसंगाविषयी केलेले नवीन निवेदन, काही काळापर्यंत तरी प्रमाण मानले जाते. त्यानंतर जेव्हा त्या प्रसंगाची वेगळी मांडणी करणारे निवेदन लोकांपुढे येते, तेव्हा त्याला त्या प्रसंगाचे (किंवा इतिहासाचे) पुनर्लेखन म्हणावे लागते. हे पुनर्लेखन कसे मान्यता पावते किंवा नाकारले जाते, त्याचा थोडा विचार काही उदाहरणांच्या सहाय्याने करू.

कै. गो. स. सरदेसाई यांनी 'मराठी रियासत' हा मराठ्यांचा इतिहास सांगणारा व बहुत काळ प्रमाण मानलेला ग्रंथ विसाव्या शतकाच्या सुरुवातीला सिद्धीस नेला. त्या रियासतीचा, संभाजी व राजाराम यांच्या कारकिर्दीचा इतिहास सांगणारा, दुसरा खंड १९०२साली प्रसिद्ध झाला. त्याची दुसरी आवृत्ती १९१५ साली निघाली. त्या काळी इतिहासकारांत व सर्वसाधारण लोकांतही संभाजीराजांच्या राजवटीविषयी व व्यक्तिमत्त्वाविषयी असा अभिप्राय होता की, 'शौर्य, पराक्रम, राष्ट्रप्रेम इत्यादी थोर गुण संभाजीच्या ठिकाणी भरपूर होते; इतके असूनही अनावर क्रोधावेशामुळे नऊ वर्षांच्या अल्पावधीतील त्याचे सर्व प्रयत्न फुकट जाऊन त्याचा शेवट हृदयद्रावक झाला....याच कारणास्तव बखरकरांनी संभाजीचे वर्णन 'उग्रप्रकृती' असे केले आहे.' (मराठी रियासत खंड २, प्रकरण १). विसाव्या शतकाच्या सुरुवातीला संभाजीराजांच्या चरित्रावर 'राजसंन्यास' (अपूर्ण) व 'बेबंदशाही' ही नाटके लिहिली गेली. त्या नाटकांतही संभाजीराजांचे पात्र याच वर्णनानुरूप रंगविले होते. (ही नाटकेदेखील संभाजीराजांच्या कारकिर्दीची निवेदनेच होत.)

१९३५ साली सरदेसायांनी या पुस्तकाची तिसरी (व सुधारित) आवृत्ती काढली. तिच्या प्रस्तावनेत सरदेसायांनी लिहिले होते–'संभाजीचरित्रांच्या या मांडणीवरून सहज दृष्टी फिरविली तरी पूर्वीच्या आवृत्तीतील काहीच अंश यात शिल्लक राहिलेला नाही हे लक्षात येईल.' असे असले तरी संभाजीराजांचा एकूण

अनुक्रमणिका

कारकिर्दीवरचा सरदेसायांचा शेरा काही बदलला नव्हता.

त्यानंतर गोव्यातील दफ्तरातील पोर्तुगीज कागदपत्र संशोधकांना उपलब्ध झाले. मराठ्यांविषयीचे मोगल दरबारातील फारसी कागद अभ्यासकांपुढे आले. सेतुमाधवराव पगडी यांनी अनेक फारसी दस्तऐवजांची मराठीत भाषांतरे केली. यामुळे त्या कालखंडाविषयी इतके नवे तपशील हाताशी आले की, संभाजीराजांच्या चरित्राकडे नव्याने दृष्टिक्षेप टाकण्याची ऊर्मी अनेक अभ्यासकांना झाली. वा. सी. बेंद्रे, कमलाबाई गोखले आणि डॉ. पी. एस. जोशी यांनी संभाजीराजांची नव्याने चरित्रे लिहिली व असे दाखविण्याचा प्रयत्न केला की, संभाजीराजांचे जे दोष म्हणून सरदेसायांनी सांगितले, ते दोष नवीन संशोधनाने मोठ्या प्रमाणात हलके पडतात व संभाजीराजांची गुणसंपदा मात्र आणखी प्रकर्षाने मनात भरते. राजांनी मोगलांच्या सैन्याला मर्दुमकीने तोंड दिले, सिद्दी व पोर्तुगीज यांच्यावर जरब बसविली, गड-किल्ले मोठ्या तरतुदीने राखले. संभाजी राजे विद्यासंपन्न होते. त्यांनी संस्कृतात काव्यरचना केली. विद्वानांना पदरी बाळगून त्यांच्या ज्ञानोपासनेला मदत केली. 'सखी राज्ञी जयति' असा आपल्या राणीचा शिक्का करून तिच्या कर्तृत्वाला वाव दिला. संभाजीराजे युवराज असताना डिसेंबर १६७८ मध्ये मोगलांना जाऊन मिळाले होते, ह्या गोष्टीकडे आतापर्यंतचे (म्हणजे सरदेसायांपर्यंतचे) अभ्यासक फितुरी म्हणून पाहत होते. परंतु, वा. सी. बेंद्रे यांनी 'अनुपुराण' या काव्यातील ७ व्या अध्यायाचा आधार घेऊन असे दाखवण्याचा प्रयत्न केला की, दिलेरखानाला जाऊन मिळताना संभाजीराजांचा हेतू, मोंगलांच्या मदतीने स्वतःचे राज्य स्थापण्याचा होता. (ही अपेक्षा अर्थातच त्यांच्या तारुण्यसुलभ भाबडेपणाला धरूनच होती.)

हे सर्व झाले इतिहास-अभ्यासकांच्या स्तरावर. त्या अभ्यासाचा आधार घेऊन नाटक-कादंबऱ्यादी ललित-साहित्यातून संभाजीराजांचे चरित्र रंगविणाऱ्यांनी, पूर्वीच्या इतिहासकारांनी मर्यादित दस्तऐवजांच्या आधारावर संभाजीराजांच्या दोषांवर अवाजवी भर दिला आणि त्यांच्या सद्गुणांकडे दुर्लक्ष केले, असा दावा करीत संभाजी-राजांचे भरजरी चरित्र नाटकांतून व कादंबऱ्यांतून देदीप्यमान शब्दांनी उभे केले. जुने सर्व इतिहास रद्दबातल झाले. संभाजीराजांचे हौतात्म्य, बिकट परिस्थितीत अमाप सैन्यबल असणाऱ्या मोगलांशी त्यांनी दिलेली कडवी व एकाकी झुंज, त्यांची सावत्र आई व तिला सामील होऊन राजांविरुद्ध कट करणारे मुरब्बी मुत्सद्दी व सेनानी यांच्या कारस्थानांना शक्य तितक्या समजुतीने पण खंबीरपणाने सोसण्याची त्यांची भूमिका अशा अनेक पैलूंचा गौरव करणाऱ्या या ललितवाङ्मयामुळे जुना इतिहास पुसला गेला व हे आकर्षक पुनर्लेखन लोकप्रिय झाले.

असाच एक, पण उलटया दिशेचा, पुनर्लेखनाचा प्रयत्न बेळगावकडचे एक अभ्यासक पां. गो.रानडे यांनी ना फडणिसांच्या चरित्राविषयी केला होता. 'नारायणरावाचा खून की आत्महत्या?' ही त्यांची लेखमाला आचार्य नाना प्र. के. अत्र्यांच्या 'साप्ताहिक नवयुग' मधून १९४५ साली प्रसिद्ध झाली व फार गाजली. नाना फडणीस यांनी पेशवाईच्या उतरत्या काळात एकहाती राज्य सांभाळले, पेशवा सवाई माधवराव याचे लालनपालन केले, इंग्रजांशी दीर्घकाळापर्यंत लढाई नेटाने लढवून त्यांच्या महत्त्वाकांक्षेला आळा घातला; तोतयाचे बंड आणि मोरोबादादाचे कारस्थान अशा गंभीर संकटांतून पेशवाईचा बचाव केला, सखाराम बापू हा 'असून अडचण नसून खोळंबा' अशा वर्गातला मुरब्बी मुत्सद्दी, पण त्याला कैदेत घातले; 'भले बुद्धिचे सागर नाना ऐसे नाही होणार' अशी दिगंत कीर्ती मिळविली. विख्यात इतिहासकार वासुदेवशास्त्री खरे यांनी 'नानांचा अधिकारयोग' व 'नाना फडणविसांचे चरित्र' अशी नाना फडणिसांची साधार व मनोरम चरित्रे लिहून नानांचे हे वेगळे मोठेपण इतिहासप्रेमींच्या मतावर बिंबवले होते. तथापि रानडे यांनी ऐतिहासिक साधनांचा भरपूर आधार घेऊन नाना फडणीस हे पेशवाईतील खलपुरुष होते, नारायणराव पेशवे यांचा खून झालाच नाही, नानांनी कारस्थाने करून नारायणरावांना आत्महत्या करण्याला भाग पाडले; नाना हे स्वार्थी, द्रव्यलोलुप, अधिकारलोभी, चारित्र्यहीन व स्त्रीलंपट गृहस्थ होते; नारायणरावांच्या आत्महत्येचा उपयोग करून घेऊन त्यांनी नारायणरावांनंतर पेशवाईवर अधिकार असणाऱ्या रघुनाथराव पेशव्यांवर खुनाचा

आळ घातला व त्यांना पळवून लावले आणि पेशवाई लाटली, असे अनेक आरोप त्यांनी नानांवर केले व ह्या सर्वांस भरपूर कागदोपत्री पुरावा असल्याचे दाखवून दिले. इतिहासाच्या पुनर्लेखनाचा हा अचाट प्रयोग होता.

परंतु 'नारायणरावांचा खून की आत्महत्या' या पुस्तकाचे अवडंबर उलथून देणारी जबरदस्त लेखमाला न. र. फाटक यांनी 'नवाकाळ'मध्ये लिहून रानडे यांची चलाखी, दस्तऐवजांतील उताऱ्यांचा चुकीचा अर्थ लावण्याचा खटाटोप, आणि 'सुतावरून स्वर्ग गाठण्या'ची हुशारी उघडी केली. लेखकाच्या प्रत्येक युक्तिवादातील खोटेपणा त्यांनी नेमकेपणाने लोकांसमोर आणला. त्यानंतर वर्षा–दोन वर्षांतच लोक हा वाद विसरून गेले. नाना फडणीस यांचा लौकिक कायम राहिला. (पुढे २५ वर्षांनी विजय तेंडूलकर यांनी 'घाशीराम कोतवाल' नावाचे नाटक लिहून त्यात 'नाना फडणीस' नावाचे स्त्रीलंपट पात्र दाखविले. त्यावर बरीच टीका झाली. तेव्हा तेंडुलकरांनी जाहीर केले की, 'माझे नाटक अनैतिहासिक आहे.' या खुलाशानंतर ह्या नाटकाला ऐतिहासिक नाना फडणिसाबद्दलचे निवेदन म्हणावयाचे का, असा प्रश्न येतो. मला वाटते ह्या नाटकालादेखील एक दस्तऐवज किंवा निवेदन म्हणून स्वीकारले पाहिजे.)

आता शेवटी थोडक्यात आढावा घ्यायचा तो अगदी अलीकडच्या एका 'पुनर्लेखना'चा. श्री. शेषराव मोरे यांनी 'गांधींनी आणि काँग्रेसने अखंड भारत का नाकारला?' या नावाने एक मोठे पुस्तक लिहिले. गांधीजींच्या बरोबर वावरलेल्या माणसांनी सांगितलेल्या आठवणी व त्यांनी आत्मचरित्रांतून दिलेल्या हकिकती, त्या काळातील वृत्तपत्रांनी मोठेमोठे मथळे देऊन गाजविलेले, "आधी माझ्या देहाची फाळणी होईल व मगच हिंदुस्थानची" हे गांधीजींचे वक्तव्य इत्यादींमुळे लोकांच्या मनात असे चित्र निर्माण झाले होते की, फाळणीला गांधीजींचा तीव्र विरोध होता. आता श्री. शेषराव मोरे असे सांगतात की, गांधीजी हे फार थोर मुत्सद्दी होते. फाळणी अपरिहार्य आहे, हे त्यांना 'मुस्लिम लीग'ने पाकिस्तानचा ठराव १९४० साली केला, तेव्हाच समजून चुकले होते. 'फाळणीला मान्यता दिल्याखेरीज स्वातंत्र्य मिळणार नाही', हे हिंदूंना कसे पटवायचे, हा खरा प्रश्न होता. त्यासाठी गांधीजींनी ४२ साली 'भारत छोडो' या आंदोलनाची हूल उठविली. त्यांना आंदोलन करायचेच नव्हते. आंदोलनाआधी व्हाइसरॉयशी वाटाघाटी सुरू करायच्या असा गांधींचा बेत होता. वाटाघाटी झाल्या असत्या तर फाळणीचा प्रश्न चर्चेला आलाच असता. मग गांधीजी आधी काँग्रेसला व त्याद्वारे हिंदूंना पटवून देऊ शकले असते की, फाळणीला मान्यता देऊन स्वातंत्र्य मिळविणे हेच हिताचे आहे. श्री. शेषराव मोरे यांच्या गांधीजींविषयीच्या या नव्या प्रतिपादनाकडे अद्यापतरी अभ्यासकांचे बऱ्याच अंशांनी दुर्लक्ष झाले आहे.

या उदाहरणांचा उल्लेख करताना मला कुणाची बाजू घ्यायची नाही किंवा कुणाचा विरोध करावयाचा नाही. इतिहासाचे पुनर्लेखन कोणत्या हेतूने केले जाते, ते लोकांपुढे कसे येते, समाज ते पुनर्लेखन कोणत्या विचाराने स्वीकारतो वा नाकारतो, ही एकूण प्रक्रिया या उदाहरणांतून मला समजून घ्यावयाची आहे. आतापर्यंतच्या उदाहरणांवरून असे दिसते की, प्रचलित समजुतींना ठोकर देण्याची खुमखुमी दर पिढीलाच असते. आजपर्यंत चालत आले म्हणून ते स्वीकारायचे, हे अनेकांना पसंत पडत नाही. त्यातून आपल्या समाजात तर लोकांच्या विचारांना अनेक पूर्वग्रहांचा खडबडीतपणा आलेला असतो. जातीयवाद, धर्मवाद, प्रदेशवाद असे अनेक कोपरे व काटे माणसांच्या सरळ विचारांना छेद देत असतात. त्यामुळे प्रस्थापिताला दिलेला धक्का, निदान अलीकडच्या काळात तरी, समाजाच्या पसंतीला उतरण्याची शक्यता जास्त असते. त्यातून हे पुनर्लेखन विषयाच्या शोधनियतकालिकांतून अभ्यासकांसमोर मांडण्यापेक्षा त्यांच्या डोक्यावरून पलीकडे जाऊन सर्वसाधारण नागरिकांसमोर मांडण्याचा प्रयत्न पुनर्लेखनवादी करतात. त्यामुळे या पुनर्लेखनाला 'अभ्यासकांपुढे उपस्थित केलेला प्रश्न' असे गंभीर व संयमित रूप न येता एका चळवळीचे रूप येते. ही आपल्या मराठी समाजाची गोष्ट झाली. केवळ इतिहासाविषयीच्या लेखनालाच अशा वावटळीतून जावे लागते असे नाही. तात्त्विक चर्चा, वाङ्मयीन समीक्षा यांनाही अनेकदा हमरीतुमरीचा रंग येतो. पण इतिहास हा मराठी लोकांच्या जिव्हाळ्याचा विषय आहे. त्यामुळे त्याबद्दलचे वाद हे बहुधा नेहमीच आवेशाने आणि

सार्वजनिक पातळीवर लढविले जातात. यालाच उद्देशून कै. त्र्यं. शं. शेजवलकरांनी 'इतिहासाचा ब्रह्मसमंध महाराष्ट्राच्या मानगुटीला बसला आहे', असे जरा त्राग्याने लिहिले होते.

हा सर्व झाला पुनर्लेखनविषयीचा व्यावहारिक विचार. पण याच्याहून थोडे खोलात जाऊन विचार करणे शक्य आहे. ई. एच. कार नावाचा विख्यात इतिहासकार होऊन गेला. तो म्हणत असे की, इतिहास हा वर्तमानाने भूतकाळाशी साधलेला संवाद असतो. साहजिकच, वर्तमानकाळ हा समकालीन प्रश्नांच्या उत्तरांची भूतकाळाकडून अपेक्षा करतो. उदा., विधवांच्या विवाहाचा प्रश्न महाराष्ट्रात हिरिरीने चर्चिला जात होता तेव्हा न्या. रानडे, डॉ. भांडारकर वगैरे पुनर्विवाहवादी प्राचीन ग्रंथांतून पुनर्विवाहांचे दाखले किंवा पुनर्विवाहाला पाठिंबा देणाऱ्या उक्ती शोधू लागले. तीच गोष्ट महाराष्ट्रातील संतांच्या कामगिरीची. युरोपात १६ व्या शतकात ख्रिस्ती धर्मसुधारणेची मोठी चळवळ झाली. मार्टिन ल्यूथर (१४८३–१५४६) याने चर्चचा प्रमुख असलेल्या पोपच्या अनेक अधिकारांना (उदा., माणसाने केलेल्या पापाची क्षमा करण्याचा अधिकार.) आव्हान दिले. त्यातून चर्चने ऐहिक व राजकारणी घडामोडींत हस्तक्षेप करण्याला विरोध करणारी मोहीम उभी राहिली. १९ व्या शतकात ही माहिती आपल्याकडे आली. आपले संत ज्ञानेश्वर, नामदेव, एकनाथ, तुकाराम यांनीही सन १३०० पासून सन १६५० पर्यंत, साडेतीनशे वर्षे, महाराष्ट्रात धर्मसुधारणेची चळवळच चालवली होती, ग्रंथप्रामाण्याला आव्हान दिले होते, रूढी व अंधश्रद्धा यांना विरोध केला होता, असा नवा विचार रानडे, भांडारकर, तेलंग वगैरे धर्मसुधारणावादी व प्रार्थनासमाजवादी विद्वानांना सुचला. इतकेच नव्हे तर संतांनी मशागत करून ठेवलेल्या जमिनीतूनच शिवाजीराजांनी स्वराज्याचा मळा फुलवला, असे प्रतिपादन करणारा 'द राइज ऑफ मराठा पॉवर' हा ग्रंथ न्या. रानडे यांनी लिहिला.

आपण जरी नवा वाटणारा विचार मांडत असलो तरी त्याची जातकुळी फार जुनी आहे, असे दाखविण्याचा आग्रह नव्याने उद्भवलेल्या संप्रदायांचा असतो. त्यातून इतिहासाच्या अभ्यासाला आणि संशोधनाला निराळी प्रेरणा मिळते. गेल्या पन्नास वर्षांत स्त्रीमुक्तीची वैचारिक चळवळ लोकांसमोर आली आहे. ताराबाई शिंदे यांनी 'स्त्री-पुरुष तुलना' नावाचे पुस्तक सुमारे सव्वाशे वर्षांपूर्वी लिहिले. त्या काळी त्या पुस्तकाची दखल फारशी कोणी घेतली नाही व ते पुस्तक विस्मृतीच्या गर्तेतच पडल्यासारखे झाले होते. पण स्त्रीवादी अभ्यासकांनी आपल्या वाङ्मयात स्त्रियांच्या आत्मभानाचा शोध घेण्याचा प्रयत्न केला आणि पार मुक्ताबाईपासून बहिणाबाई, कान्होपात्रा या मार्गाने एकोणिसाव्या शतकापर्यंत तो शोध पोचला. त्यात त्यांना ताराबाई शिंद्यांचे हे पुस्तक गवसले. रमाबाई रानडे, आनंदीबाई जोशी, काशीताई कानिटकर व ताराबाई शिंदे अशा सगळ्यांच्या लिखाणातून स्त्रियांच्या आत्मसन्मानाचे व सात्त्विक शक्तीच्या स्फुल्लिंगाचे दर्शन होऊ लागले. या सर्व स्त्रियांनी लिहिले तेव्हा प्रत्येकीचा उद्देश स्वतःच्या व्यथा आणि आकांक्षा व्यक्त करण्याचा असेलही; पण त्या लिखाणाला स्त्रियांच्या एकत्रित वेदनेचा उच्चार म्हणावे की नाही, याचा वस्तुनिष्ठ निर्णय करणे अवघड आहे.

इतिहास हा 'आज'ने 'काल'शी आपल्या नात्याचा घेतलेला धांडोळा असतो. ह्या नात्याचे आदर्श रूप काय असावे याचे ठोकताळे बांधून 'आज' हा गतकाळरूपी अडगळीची हुसकाहुसक करत असतो. आदर्श नात्याला उपकारक होतील असे दस्तऐवज हाती लागले तर ठीकच; त्या दस्तऐवजांचे अनुकूल खुलासे मांडून नाते सजवता येते. तसे करण्याचा प्रयत्न १९ व्या शतकात रानडे, भांडारकरांनी किंवा अलीकडच्या काळात, संभाजीराजांच्या बाबतीत, बेंद्रे आणि वसंत कानेटकरांनी केला. उपकारक दस्तऐवज सापडले नाहीत तर दंतकथांची पेरणी करून इतिहास सजवावा व नाते गौरवशाली करावे; विवेकाच्या टोचणीच्या भीतीमुळे गेल्या गोष्टींची कल्पनेने नवरचना करण्याचा बेधडकपणा नसेल तर गत काळाला दोष लावत व तो काळ अधिक काळाकुट्ट करीत, आताच्या पिढीची जबाबदारी फार मोठी आहे असा सुस्कारा सोडावा, असे नमुने इतिहासाच्या पुनर्लेखनात पाहायला मिळतात.

(४)

आतापर्यंत आपण पाहिले की, घटिताची विविध निवेदने एकत्र करून त्यांचा न्यायाधीशाच्या तटस्थ

भूमिकेतून मेळ घालून निवाडारूपी नवीन निवेदन तयार करीत घटिताचे शक्य तितके वस्तुनिष्ठ चित्र रंगवावे, हे इतिहासकाराचे काम असते. ते काम किती अवघड आहे, याची उदाहरणे आपण पाहिली. पण घटिताचे हुबेहूब व निरपवाद चित्रण शक्य नाही म्हणून तो मार्ग सोडूनच द्यायचा का? बाजारातील वजने-मापे काटेकोरपणे तपासून पाहिली तर ती नक्कीच कमीजास्त निघतील. पण त्यामुळे आपण वजने-मापे वापरणेच निरुपयोगी आहे, असे म्हणतो का? आपण ती वजने-मापे शक्य तितकी प्रामाणिक राहतील, याची खबरदारी घेतो. १९ व्या शतकात युरोपात इतिहासलेखनाच्या शास्त्राचा गंभीरपणे विचार सुरू झाला, तेव्हा रांके (१७९५-१८८६) या इतिहासकाराने दस्तऐवजांचा उपयोग करून इतिहास लिहिला पाहिजे; याचा आग्रह धरला. त्याने स्वतः युरोपातील अनेक दफ्तरखाने तपासून धर्मसुधारणेच्या काळातील घटनांचे शक्य तितके वस्तुनिष्ठ वर्णन देणारी निवेदने लिहिली. एकोणिसाव्या शतकाच्या पूर्वार्धात अस्सल समकालीन कागदपत्रांचा जसा आग्रह रांकेने धरला, तसाच कागदपत्रांचा आग्रह वि. का. राजवाडे यांनी मराठ्यांच्या इतिहासाच्या बाबतीत विसाव्या शतकाच्या सुरुवातीला धरला. बखरी व मुसलमानी तवारिखांनी दिलेली घटनांची माहिती कागदपत्रांच्या पुराव्यांनी पडताळून पाहिल्यानंतरच स्वीकारली पाहिजे, असे त्यांनी खडखडीतपणे सांगितले आहे. (पाहा- मराठ्यांच्या इतिहासाची साधने, खंड ८ ची प्रस्तावना.)

मिशले (१७९८-१८७४) हा फ्रेंच इतिहासकार रांकेचा समकालीन होता. याने फ्रान्सचा फार विस्तृत इतिहास मध्ययुगीन काळापासून तो १९व्या शतकाच्या मध्यापर्यंतचा लिहिला. मिशलेच्या इतिहासदृष्टीनुसार इतिहास हा थोर व्यक्तींच्या चरित्रांतून घडत नसून एकूण समाजात जो एकजीवपणा नांदत असतो, त्या एकजीवपणाच्या उत्क्रांतीतून घडत जातो. तो सांगतो की, 'नेत्यांपेक्षा रोजचे आयुष्य परिपाठाप्रमाणे जगणारी माणसे जास्त महत्त्वाची असतात. इतिहासातील धुरंधर भासणारी माणसे ही खरेतर सर्वसाधारण माणसांच्या समूहाने पाठीमागून खेचलेल्या दोऱ्यांमुळे नाचणाऱ्या बाहुल्यांसारखी असतात.' आपला हा मध्यवर्ती विचार त्याने फ्रेंच राज्यक्रांतीचा इतिहास लिहिताना फार कौशल्याने वापरला. इतिहास लिहिताना आपण संपूर्ण समाजाचे जैविक एकवटलेपण लक्षात घेऊन त्या एकवट समाजाच्या हालचालींचा व आकांक्षांचा आढावा घेतला पाहिजे, ही महत्त्वाची दृष्टी मिशलेने इतिहासकारांना दिली.

संपूर्ण समाज हाच इतिहासकर्ता आहे असा विचार करायचे ठरले तर साहजिकच एखाद्या व्यक्तीच्या जशा काही महत्त्वाकांक्षा असतात तशा समाजाच्याही असल्या पाहिजेत, असे मानावे लागेल. १९ व्या शतकाच्या पूर्वार्धात फ्रेडरिक विल्यम (तिसरा) (१७७०-१८४०) हा (आता जर्मनीचा एक प्रांत असलेल्या) प्रशियाचा राजा होता. त्याच्या नेतृत्वाखाली जर्मनीचे एकछत्री राज्य स्थापन व्हावे अशी महत्त्वाकांक्षा जर्मन समाजाने जोपासली होती. जर्मन समाजात असा विचारप्रवाह होता की, 'एकछत्री राज्य' हीच समाजाची अंतिम आकांक्षा असली पाहिजे. हेगेल (१७७०-१८३१) हा तत्त्वज्ञ आणि त्याचे अनुयायी यांनी या विचाराला मोठा तात्त्विक आधार आपल्या विचारप्रणालीतून मिळवून दिला.

आपण समाजाचा 'एकवट-जैविक-व्यक्ती' अशा दृष्टिकोणातून विचार करण्याचे ठरवले, तर त्या समाजाच्या महत्त्वाकांक्षांचा विचार जसा करावा लागतो, त्याचबरोबर त्या समाजातील व्यक्तींमध्ये असे कोणते नातेसंबंध असतात की, ज्यांच्यामुळे आपण समाजाचा एकवट विचार करू शकतो, समाजातील व्यक्तींमधील हे नातेसंबंध बदलण्यामागील सूत्र कोणते, नातेसंबंध बदलले तरी समाज एकसंध कुठल्या कारणाने राहतो, अशा प्रश्नांचा विचार साहजिकच पुढे येतो. तसा तो अनेकांनी केला व त्यापैकी कार्ल मार्क्स (१८१८-१८८३) याने मांडलेला विचार फारच प्रभावी ठरला.

मार्क्सचे म्हणणे असे होते की, समाजाने स्वतःच्या निर्वाहासाठी जी उत्पादनव्यवस्था निर्माण केलेली असते, त्या व्यवस्थेत सामील झाल्यामुळे व्यक्तिव्यक्तींतील संबंध निश्चित होतात. जो संबंध ठरतो तो अनिवार्य आणि व्यक्तीच्या इच्छेच्या निरपेक्ष असतो. समाजाची जी उत्पादनसाधने असतात, त्यांच्या स्वरूपावर या संबंधांची ठेवण अवलंबून असते. उत्पादनव्यवस्थेमुळे ठरून गेलेल्या या संबंधांची एकत्र जुळणी केली म्हणजे समाजाचे

अर्थकारण सिद्ध होते. या पायावर समाजातील कायदेकानू, राज्यव्यवस्था यांची इमारत बांधली जाते. समाजभान (सोशल कॉन्शसनेस) या इमारतीला अनुरूप असे असते. साहजिकच उत्पादनव्यवस्था बदलली की, समाजाची पूर्ण घडीच बदलून जाते. जमीनदारी समाजरचना ही जमीन हेच उत्पादनाचे मुख्य साधन होते तेव्हा त्या साधनाभोवती थाटली गेली होती. नंतर यंत्रांच्या साहाय्याने उत्पादन सुरू झाले. तेव्हा भांडवलशाही समाजरचना बांधली गेली. भांडवली अर्थरचनेतील अंतर्विरोधामुळे कामगारवर्ग उत्पादनसाधने आपल्या ताब्यात घेईल, तेव्हा साम्यवादी समाज निर्माण होईल.

इतिहासाचा उलगडा करणारे सूत्र मार्क्सने सांगितल्यावर भारताच्या इतिहासालाही ते सूत्र लागू पडते हे दाखविण्याचे प्रयत्न, ज्यांनी मार्क्सवाद अंगीकारला होता अशा, अभ्यासकांकडून सुरू झाले. कॉम्रेड स. अ. डांगे यांनी 'इंडिया फ्रॉम प्रिमीटिव्ह कम्युनिझम टु स्लेव्हरी' नावाचे पुस्तक १९४९ साली लिहिले. हेही इतिहासाचे पुनर्लेखनच होते. कारण यात मूळ ऋचांचे थोडे वेगळे अर्थ लावले होते. या पुस्तकावर टीकाही पुष्कळ झाली.

(५)

आपण इतिहासाचे लेखन आणि पुनर्लेखन कोणत्या प्रेरणांतून आणि हेतूंतून होते, याचा बराच विस्तृत आढावा घेतला. त्यावरून हे स्पष्ट होईल की, वस्तुनिष्ठ इतिहास किंवा 'खरा' इतिहास ही गोष्ट शक्य नाही. त्यामुळे आपण इतिहासाविषयी चिंतन करतो, तेव्हा इतिहासाचा वचक बाळगून चिंतन केले पाहिजे, असे नाही. आजच्या आपल्या आकांक्षा व अपेक्षा काय आहेत, याचा विचार करून 'इतिहासा'ला मुरड घालण्याचे काम दर पिढीत होत आले आहे आणि आपण कितीही प्रामाणिकपणाचा आव आणला तरी आपण इतिहासात आपणाला पाहिजे तेच शोधत असतो व तेच आपणास या ना त्या मार्गाने सापडतेही.

इतिहासाला काही सूत्र आहे अशी खूणगाठ बांधून जेव्हा इतिहासाची मांडणी सुरू होते, तेव्हा मात्र झगडा होण्याची शक्यता असते. भाजप किंवा कम्युनिस्ट सत्तेवर आले की, वादावादी वाढते; कारण भारताच्या इतिहासाचे आकलन करून घेण्याची निरनिराळी–परस्परविरोधी–सूत्रे ही या दोन विचारप्रणालींचा अविभाज्य भाग आहेत. कम्युनिष्ट पक्ष बंगालमध्ये राज्यावर आला तेव्हा त्याने शिक्षणव्यवस्थेला कबजात घेतले. शाळा-महाविद्यालयांतील शिक्षक नेमण्यासाठी त्यांनी राज्यस्तरीय निवड समित्या स्थापन केल्या व त्यांवर पक्षाचे कार्यकर्ते नेमले. इतिहासाची पाठ्यपुस्तके बदलली. (प्राथमिक शाळेसाठी बंगाली भाषेची रवींद्रनाथांनी तयार केलेली पाठ्यपुस्तके काढून टाकण्याचा प्रयत्न कम्युनिस्ट सरकारने केला, तेव्हा जनतेने त्याविरुद्ध हलकल्लोळ केला.) जे देश साम्यवादी पक्षांच्या राजवटीखाली होते, तिथे इतिहास-अध्यापनाची कशी परवड झाली याचे अनेक पुरावे, त्या राजवटी कोसळल्यानंतर, आता पुढे येत आहेत.

संघपरिवारानेही भारतीय इतिहासाच्या आकलनातून एक सूत्र तयार केले आहे. त्यांचे म्हणणे असे दिसते की, वेदकाळापासून आजवर भारतीय समाजात एक सातत्य दिसून येते. त्या सातत्याचा आधार निरनिराळ्या अवस्थांतून परिणत झालेला हिंदुधर्म हा आहे. भारतावर वेळोवेळी ग्रीक, शक, कुशाण, हूण यांनी आक्रमणे केली व स्वतःची राज्ये स्थापिली. पण ते हिंदुकेंद्रित भारतीय समाजात मिसळून गेले. मुसलमान व ख्रिस्ती धर्मांची आक्रमणे गेल्या हजार वर्षांत झाली. आक्रमक इथे आलेले परकीय होते; पण त्या धर्मांचे अनुयायी हे भारतीयच होते. त्या आक्रमकांचा वारसा सांगून या भारतीयांनी स्वतःला निराळे राखणे, हे समाजात फाटाफूट असल्याचे कारण आहे. या दोन धर्मीयांनी आपला उपासनापंथ वेगळा ठेवावाही–नाहीतरी शीख, बौद्ध, जैन, लिंगायत असे उपासनापंथ आहेतच– पण त्यांनी भारतीय समाजात मिसळून गेले पाहिजे.

भाजपासरकार आल्यावर या सूत्राला धरून लिहिलेली इतिहासाची पाठ्यपुस्तके एन.सी.ई.आर.टी. कडून तयार केली जातील, तीच शिकविली जातील. परिणामतः धार्मिक अल्पसख्याकांना असुरक्षित वाटू लागेल व समाजातील दुफळी वाढत जाईल, अशी भीती विरोधकांना वाटते. या भीतीत मुद्दा आहे, हे मान्य करावेच लागेल. भाजपने हे भान ठेवले पाहिजे की,

निवडणुकीतला जय म्हणजे आपल्या सर्व विचारव्यूहाला जनतेने दिलेली मान्यता आहे असे मानणे, हा भ्रम आहे. तुम्ही तुमच्या विचारांचा प्रचार करण्याला मुखत्यार आहात. मात्र सरकारी संस्थांचा त्यासाठी उपयोग करणे हे समजूतदारपणाचे होणार नाही.



अनुक्रमणिका

# मर्ढेकरांच्या काव्यावरील आंग्लकवींचा प्रभाव

अनिल शेंडे

मराठी नवकाव्याचे आद्यप्रणेते आणि मराठी कवितेच्या प्रांतात प्रचंड खळबळ उडवून देणारे, आपल्या अनवट काव्यशैलीने आणि प्रतिमासृष्टीने मराठी काव्यसृष्टीला अंतर्बाह्य हादरवून सोडणारे एक युगप्रवर्तक, क्रांतिकारी कवी म्हणजेच, बाळ सीताराम मर्ढेकर यांच्या काव्यावरील आंग्लकवींचा प्रभाव, ह्या विषयावर प्रकाश टाकण्याचा मी आज प्रयत्न करणार आहे; पण तत्पूर्वी केवळ एखादा कवी किंवा एखादा साहित्यप्रकारच नव्हे, तर एका संपूर्ण भाषेवरसुद्धा दुसऱ्या भाषेचा किंवा भाषांचा प्रभाव कसाकसा पडत जातो, याचेही थोडक्यात विवेचन मी करणार आहे.

कोणत्याही भाषेच्या इतिहासात त्या भाषिक प्रदेशाच्या राजकीय इतिहासाचाही मोठा प्रभाव पडत असतो. इंग्रजांची राजवट भारतावर जवळजवळ दीडशे वर्षे होती. जेत्या राज्यकर्त्यांच्या भाषेचा स्थानिक भाषांवर होणारा परिणाम अशा वेळी अपरिहार्य ठरतो. जवळजवळ आठशे वर्षांच्या मुस्लिम राज्यकर्त्यांच्या अमलाच्या काळातसुद्धा त्यांच्या फारसी, अरबी भाषांचा प्रभाव भारतीय भाषांवर झालेला स्पष्ट दिसतो; इतकेच नव्हे, तर फारसी, अरबी, पश्तू यांच्या हिंदीवरील प्रभावातून उर्दू नावाच्या एका नवीन भाषेचा जन्म झाला, हेही सर्वविदितच आहे. इंग्रजी राजवटीत इंग्रजी शिक्षणाचा प्रचार आणि प्रसार झाल्यानंतर आणि इंग्रजी साहित्याची ओळख येथील विद्वानांना आणि शिक्षितांना झाल्यानंतर मराठी साहित्याच्या आणि विशेषकरून कवितेच्या एकूणच स्वरूपात फार मोठे परिवर्तन झालेले दृष्टोत्पत्तीस येते. अर्वाचीन मराठी कवितेबाबत बोलायचे झाल्यास केवळ मर्ढेकरच नव्हेत, तर संपूर्ण अर्वाचीन मराठी कवितेवर इंग्रजी कवींचा, इंग्रजी कवितांचा, इंग्रजीतील वेगवेगळ्या प्रवाहांचा प्रचंड प्रभाव पडलेला अगदी वरवर पाहणाऱ्या वाचकाच्या लक्षात आल्याखेरीज राहणार नाही. इंग्रजीच्या प्रभावापूर्वी मराठीच नव्हे, तर भारतातील जवळजवळ सर्वच भाषांतील कविता ही, काही तुरळक अपवाद सोडल्यास, परलोकनिष्ठ होती. इंग्रजी कवितेच्या प्रभावानंतर ही कविता परलोक निष्ठेकडून इहलोकनिष्ठेकडे झुकायला सुरुवात झाली.

केशवसुतांना आधुनिक मराठी कवितेचे जनक मानले जाते. केशवसुतांच्या समग्र काव्याचा अभ्यास केल्यानंतर त्यांच्या कवितांवरसुद्धा इंग्रजी काव्याचा प्रभाव स्पष्टपणे दिसून येतो. प्रा. रा. श्री. जोग यांनी, "पूर्णतया इंग्रजीचे अनुकरण करणारा कवी," ह्या शब्दांत केशवसुतांची संभावना केलेली आहे. केशवसुतांच्या काव्यातील बऱ्याच कल्पना ह्या पालग्रीव्हने संपादित केलेल्या, 'गोल्डन-ट्रेझरी'तील कवितांतूनच घेतल्या आहेत. केशवसुतांच्या 'सृष्टी आणि कवी', ह्या शीर्षकाच्या दोन कविता आहेत. त्यांपैकी दुसरी म्हणजे, "मी एकला फिरतसे बहुवार रानीं" ही कविता इमर्सनच्या 'अपॉलाजी' या कवितेचे भाषांतर आहे, असे प्रा. जोग म्हणतात. रविकिरण मंडळाच्या कवींवरील इंग्रजी काव्याचा प्रभाव हा सर्वश्रुत आहे. सॉनेट किंवा सुनित हा काव्यप्रकार मराठीत इंग्रजीतूनच आला, हेही सर्वज्ञात आहे; तसेच कवी अनिलांनी मराठीत रुजविलेला मुक्तछंद हा काव्यप्रकार इंग्रजीतील 'फ्री-व्हर्स'चाच अवतार आहे, याबद्दलही कुणाला शंका नाही.

अशा ह्या सर्व पार्श्वभूमीवर मर्ढेकरांच्या काव्यावर इंग्रजी कवींचा प्रभाव न पडता तरच नवल! कारण ह्या सर्व कवींपेक्षा मर्ढेकरांचा इंग्रजी साहित्याचा व्यासंग, एक माधव ज्युलियनांचा अपवाद सोडल्यास, अधिक होता. मर्ढेकर स्वतः १९२९ ते १९३३ ह्या काळात प्रत्यक्ष इंग्रजीच्या माहेरघरी म्हणजे इंग्लंडमध्ये वास्तव्यास होते. आय. सी. एस. च्या परीक्षेत जरी त्यांना अपयश आले, तरी इंग्रजी-साहित्य ह्या विषयात त्यांना विक्रमी सर्वाधिक गुण मिळाले होते; तसेच काही काळ ते एल्फिन्स्टन कॉलेजमध्ये इंग्रजीचे उपप्राध्यापक व काही काळ 'टाइम्स

अनुक्रमणिका

ऑफ इंडिया'सारख्या मातब्बर इंग्रजी दैनिकात उपसंपादक म्हणूनही होते. इंग्रजी भाषा आणि इंग्रजी साहित्य त्यांनी उत्तमपणे आत्मसात केले होते, त्यावर त्यांनी प्रभुत्व मिळविले होते. 'Arts and Man' ह्या आपल्या अत्यंत महत्त्वपूर्ण समीक्षा ग्रंथाचे लेखन त्यांनी इंग्लंडहून भारतात परतताना जहाजप्रवासातच केले होते, ह्यावरूनही त्यांच्या इंग्रजीवरील प्रभुत्वाचीसाक्ष पटते. तथापि एक कवी म्हणून, मर्ढेकरांवर आणि त्यांच्या कवितांवर आंग्लकवींच्या कवितांचा प्रभाव पडला होता काय, आणि असल्यास तो कितपत, हे अभ्यासणे निश्चितच महत्त्वाचे आहे. त्यावरून मर्ढेकरांची एक कवी म्हणून, नवकवितेचे आद्य प्रणेते म्हणून जडणघडण कशी कशी होत गेली, हे ह्या अभ्यासातून निदर्शनास येईल.

मर्ढेकरांच्या कवितेचे ढोबळ मानाने दोन भाग करता येतील–

१) शिशिरागमातील कविता,

२) शिशिरागमोत्तर कविता.

**शिशिरागमातील कविता** – प्रथम आपण शिशिरागमातील कवितांच्या त्यांच्या वरील इंग्लिश कवींच्या प्रभावाच्या दृष्टीने विचार करू.

मर्ढेकरांच्या काव्यलेखनाची सुरुवात ही 'शिशिरागमा'तील कवितांपासून झाली. परंतु मर्ढेकरांची खरी ओळख ही त्यांच्या 'शिशिरागमोत्तर' कवितांमुळेच होते. त्यामुळे ह्या कवितांची विशेष अशी दखल घेतली जात नाही. परंतु कोणत्याही कवीची काव्यसृजनयात्रा समजून घ्यायची असेल, तर त्याच्या प्रारंभीच्या कवितांचा अभ्यास हा अनिवार्य आहे. 'शिशिरागमा'तील सर्वच कविता मर्ढेकरांच्या तारुण्याच्या भरात लिहिलेल्या व्यक्तिगत पातळीवरील प्रेमकविता आहेत. पण ह्या प्रेमकवितांत तरंग नाहीत आणि प्रणयाचे विविध रंग, विविध छटाही नाहीत. आहे ते केवळ प्रेमातील वैफल्य आणि घोर निराशा. शिशिरागमातील कवितांवर माधव ज्युलियनांच्या 'विरहतरंग' ह्या खंडकाव्याचा संस्कार आहे, असे डॉ. अक्षयकुमार काळे यांचे मत आहे.

मर्ढेकरांचा इंग्रजीचा अभ्यास त्यांच्या शाळकरी अवस्थेपासूनच अतिशय चांगला होता. त्यामुळे इंग्रजी कवींच्या प्रभावाच्या पाऊलखुणा ह्या कवितांतही दिसून येतात. त्यातल्या त्यात हाफकिन्स, यिट्स आणि जॉन डन यांचा प्रभाव स्पष्टपणे दिसून येतो. उदा., शिशिरागमातील पहिलीच कविता–

"शिशिरर्तुच्या पुनरागमे।
एकेक पान गळावया
का लागता मज येतसे।
न कळे उगाच रडावया
- - - - - - - - - - -
पुसतो सुहास स्मरुनिया।
तुज आसवे, जरि लागले
एकेक पान गळावया।
शिशिरर्तुच्या पुनरागमे"

ही कविता आणि हाफकिन्सची Spring & Fall ही कविता, यांतील साम्य पाहून ती हाफकिन्सच्या कवितेचं जणू स्वैर रूपांतरच आहे की काय, असा भास होतो. बघा –

"Margaret, are you grieving
over golden grove unleaving?
....By and by nor spare a sigh
Though worlds of
Wanwood leafy mill lie,
and yet you will
weep and know why?"

मर्ढेकरांच्या कवितेत मार्गारेटच्या ऐवजी सुहास आली आहे इतकेच. ह्या ओळींचा उल्लेख मर्ढेकरांनी आपल्या "Arts and Man" ह्या ग्रंथातील 'काव्य आणि सौदर्यमीमांसा' ह्या लेखात केलेला आहे. त्याचप्रमाणे–

"गेलो विदूषक जरी ठरुनी सुहास,
दान्ते-नि-शेक्सपिअरही-संगत आसपास
कोठेतरी स्वमरणोत्तर भाग्यकाळी– !
हा विचार न कमी मज शान्तिदायी."

आणि "I may dine at journey's end
with Landor and with Donne"

ह्या डब्लू. बी. यिट्सच्या ओळी यांतील साम्य अगदी ठसठसशीतपणे दिसून येते.

त्याचप्रमाणे जॉन डनच्या (१५७२-१६३१)

कवितांमध्ये जो युक्तिवादाचा सूर आहे, तो मर्ढेकरांच्याही कवितांमध्ये दृष्टोत्पत्तीस येतो. तसेच दोन विषम गोष्टींतील साधर्म्य त्या समोरासमोर ठेवून दर्शविण्याचा विलक्षण प्रकार, जो डनच्या कवितेत असतो, तोच प्रकार मर्ढेकरांच्या कवितांमधेही दिसून येतो. उदा.,

"घेता आचमुनी पवित्र जहरी
ही रक्तगंगा लव
विश्वाचे अभिषिक्त देव
तरुनी होतील ते मानव"

किंवा

"माझेही तुज प्रेम काय
गमले या टर्फलासारखे
ज्यांच्यातील जिवंत जीवनरसा
सौख्ये असे शोषिले?"

शिशिरागमतील काही कविता सुनित म्हणजेच सॉनेट ह्या काव्यप्रकारात लिहिलेल्या आहेत. सुनित हा प्रकारच मराठीत इंग्रजी कवितांमधून आलेला आहे. 'शिशिरागमा'तील सुनिते ही 'शेक्सपिरियन सॉनेट्स', ह्या प्रकारातील आहेत. शेक्सपियरच्या Love Sonnet चा आणि रोमँटिक कवींचाही प्रभाव 'शिशिरागमा'तील कवितांवर दिसून येतो.

**'शिशिरागमो'त्तर कविता-**

नवकवितेचे आद्य प्रणेते म्हणून मर्ढेकरांचे स्थान मराठी साहित्यात संस्थापित झाले, ते त्यांच्या 'शिशिरागमो'त्तर कवितांमुळे. 'शिशिरागमा'तील त्यांच्या कविता ह्या सर्व प्रेमकविता होत्या आणि त्यानंतर त्यांनी पुन्हा कधीही (एखाद् दुसरा अपवाद सोडल्यास) प्रेमकविता लिहिली नाही. 'शिशिरागमा'च्या नंतरच्या कवितांनी त्यांच्या काव्ययात्रेचा सांधाच बदलला आणि त्या कविता आपल्याला एका एकदम अनोळखी, संपूर्णपणे नव्या आणि अद्‌भुत बेटावर घेऊन जातात. 'काही कविता' व 'आणखी काही कविता', ही त्यांच्या नव्या काव्यसंग्रहांची नावे. ह्या कवितांमध्ये आपल्याला एक संपूर्णपणे, आमूलाग्र बदललेले मर्ढेकर भेटतात. मर्ढेकरांमध्ये आणि त्यांच्या कवितांमध्येही हा एवढा प्रचंड बदल कशामुळे झाला? ह्यावर विचार केल्यास हा बदल त्यांच्या १९२९ ते १९३३ ह्या चार वर्षांच्या इंग्लंडमधील वास्तव्यामुळे घडून आला, हे स्पष्ट होते.

ज्या काळात मर्ढेकर इंग्लंडला गेले, तो काळ दोन महायुद्धांच्या मधला संक्रमणकाळ होता. ह्या महायुद्धांमुळे मानवी इतिहासातील पूर्वीच्या कोणत्याही युद्धामुळे आलेली उद्‌ध्वस्तता, युद्धामुळे आलेले वैफल्य, दिवाळखोरी, निराशा, भय यांचा तो काळ होता. भौतिक जीवन सुखी करणारे विज्ञानातील नवनवे शोध, उद्योगीकरण आणि शहरीकरण, माणुसकीचे दुर्भिक्ष, जगण्याचे प्रयोजन विसरलेला दिशाहीन समाज, यांत्रिक युगामुळे वाढलेली भांडवलदारी वृत्ती, मजुरांचे शोषण, वैचारिक व आध्यात्मिक दिवाळखोरी, जुन्या नीतिमूल्यांवरचा आणि आदर्शांवरचा उडालेला विश्वास यांचाही तो काळ होता. ह्या सर्व घटनांचा आणि परिस्थितीचा प्रतिध्वनी साहित्यातही उमटणे अपरिहार्यच होते. ह्या वीसेक वर्षांच्या काळात काव्याच्या इतिहासात पूर्वी कधीही झाले नव्हते इतके प्रचंड बदल घडून आले. ह्या काळाचे प्रतिनिधी म्हणून टी. एस. इलियट, हाफकिन्स, यिट्स आणि ऑडेन हे ओळखले जातात. हाफकिन्स हा जरी व्हिक्टोरियन काळातला (१८४४ ते १८९८) कवी होता, तरी त्याचा पहिला काव्यसंग्रह त्याच्या मृत्यूनंतर तीस वर्षांनी म्हणजे १९१८ मध्ये प्रसिद्ध झाला. इलियटची 'वेस्ट-लँड' ही युगप्रवर्तक आणि जगप्रसिद्ध कविता १९२२ मध्ये प्रकाशित झाली, 'वेस्ट-लँड' ही कविता म्हणजे, "इंग्रजी साहित्यातील नवकवितेचा जाहीरनामा" समजली जाते. जुन्या रूढिग्रस्त परंपरागत रोमँटिक व्हिक्टोरियन काव्याविरूद्धचं ते एक बंड होतं, एक क्रांती होती. कवितेचा आशय, विषय, घाट, तंत्र, प्रतिमासृष्टी, शब्दकळा (diction) ह्या सर्वच बाबतींत ही कविता इंग्रजी साहित्यात एकमेवाद्वितीय ठरली, इंग्लंडच्या साहित्यविश्वात ह्या कवितेने एक प्रचंड वादळ निर्माण केले. इलियटच्या बाजूने आणि विरुद्ध असे वाद रंगू लागले. आणि हे सर्व वाद आणि हे वातावरण मर्ढेकरांनी स्वतः प्रत्यक्ष इंग्लंडमध्ये राहून अनुभवले. मर्ढेकरांच्या जन्मजात बंडखोर वृत्तीमुळे इलियटच्या ह्या आणि इतर कवितांचा मर्ढेकरांच्या भावविश्वावर सखोल परिणाम झाला आणि त्याचे प्रत्यक्ष प्रमाण त्यांच्या कवितेत स्पष्टपणे आढळते. उदाहरणार्थ, मर्ढेकरांची–

"पिंपात मेले ओल्या उंदीर
माना पडल्या मुरगळल्यावीण.."
आणि इलियटच्या 'वेस्ट-लँड' मधील-
"I think we are in rats' alley
where the men lost their bones" तसेच
"दिवस सांडला घाऱ्या डोळी
गात्रलिंग अन धुवून घेऊन"
आणि इलियटच्या
"They washed their feel
in Soda Water at
Et oces voics d'enfants,
chantant dans la Coupole"
(दुसरी ओळ फ्रेंचमध्ये आहे.)
"Twist Twist, twist
Jug, Jug, Jug, Jug, Jug, Jug
so rudely forced, Tereu" (Tereu हा दंतकथेतील राजा होता. त्याने एका देवीवर बलात्कार केला, असा प्रसंग दंतकथेत वर्णिला आहे.) ह्या संभोग सूचित करणाऱ्या ओळी यांत निश्चितच साम्य आहे. त्याचप्रमाणे 'काही कवितां'मधील
"हाडांचे सापळे हासती।
झडणाऱ्या मांसास पाहुनी" (का. क. ५६)
"मी एक मुंगी, हा एक मुंगी".....
......"अशा येथल्या संसारात।
जगण्याचाही चुकला पाढा
आणि शेवटी परिस्थितीचा।
गळ्याखालती उतरे काढा"
आणि इलियटच्या 'The Hollow Men' ह्या कवितेतील-
We are the hollow men
we are the stuffed men
leaning together
Headpiece filled with straw, Alas !
Our dried voices, when
we whisper together
are quiet and meaningless
ह्या ओळींतील शब्द वेगळे असले, तरी भावना आणि आशय अगदी एकच आहे.

तसेच 'वेस्ट-लँड'मधील
"Damyata (दम्यत) : The boat
responded gaily
to the hand expert
with sail and oar"
आणि "त्वत्स्मृतीचे ओळखू दे ।
माझिया हाता सुकाणू"
यांतील साम्य लक्षणीय आहे.

मर्ढेकरांनी काही इंग्रजी कविताही लिहिलेल्या आहेत. त्यातील 'रिटर्न ऑफ द मेजॉय' आणि 'कन्फेशन ऑफ द मेजॉय' ह्या दोन कविता इलियटच्या 'एरियल पोअेम्स'मधील 'जर्नी ऑफ द मेजॉय' ह्या कवितेच्या प्रभावाची साक्ष देतात.

मर्ढेकरांच्या काव्यावरील टी. एस. इलियटच्या प्रभावाची ही फक्त काही उदाहरणे आहेत. पण इलियटच्या 'वेस्ट-लँड' आणि 'हॉलो मेन' ह्या कवितांची छाया 'काही कविता' आणि 'आणखी काही कविता'तील अनेक कवितांवर कमीअधिक प्रमाणात दिसून येते.

**हाफकिन्स (१८४४-१८८९) याचा प्रभाव-**

इलियटनंतर मर्ढेकरांच्या कवितेवर सर्वाधिक प्रभाव पाडणारा कवी म्हणजे जेरॉल्ड मॅनली हाफकिन्स. मर्ढेकरांचा हाफकिन्सच्या कवितांचा अभ्यास त्यांच्या महाविद्यालयीन काळातच झाला असावा. कारण शिशिरागमातील कवितांचा परामर्श घेताना आपण, "शिशिरर्तुच्या पुनरागमे-" आणि हाफकिन्सच्या 'स्प्रिंग अँड फॉल' ह्या कवितांमधील साम्य बघितलेच आहे. हाफकिन्स आणि मर्ढेकर यांच्या व्यक्तित्वांतही साम्य आहे. विरक्ती आणि सौंदर्यासक्ती यांचे द्वंद्व ह्या दोन्ही कवींच्या व्यक्तिमत्त्वात आढळून येते. दोघेही परंपरागत धार्मिक (हाफकिन्स हा ख्रिस्ती धर्मोपदेशक होता तर मर्ढेकरांचे घराणे रामदासी पंथातले होते) असूनही दोघांवरही मार्क्सवादाचा पगडा होता.

"जाणे भांडवली वृत्ती।
नष्टचर्य पिकवी चित्ती
आणि कामगारा हाती।
करवंटीच ।। (का.क.क्र.११)

ह्या आणि अशा काही कवितांमधून मर्ढेकरांवरील

मार्क्सवादाची छाप दिसून येते. अंतरंगात सुरू असलेल्या अखंड वैचारिक द्वंद्वामुळे हाफकिन्सची कविता गुंतागुतीची, व्यामिश्र आशयाची आणि दुर्बोधतेकडे झुकलेली आहे. व्यक्तिमत्त्वातील ह्या साम्यामुळे असेल कदाचित, पण मर्ढेकरांच्याही कवितेत हाफकिन्सचे हे काव्यगुण पुरेपूर उतरले आहेत. यंत्रयुगामुळे आलेली विषमता, सुखलोलुप वृत्ती, आध्यात्मिक व नैतिक दारिद्र्य, सामान्यांबद्दलची कणव ह्यांचं दर्शन हाफकिन्सच्या तसेच मर्ढेकरांच्याही कवितेतून होते. मर्ढेकरांची कोळसेवाल्यावरची कविता-

"दणकट दंडस्नायु जैसे।
लोखंडाचे वळले नाग।
कभिन्न काळ्या मांड्या जैसा।
पोलादाचा चिरळला साग
- - - - - - - - - - - - -
–अहा कोळसेवाला काळा।
नव्या मनूतिल गिरिधर-पुतळा।।"

आणि हाफकिन्सची लोहाराच्या मुलावरची 'फेलिक्स रँन्डल' यांच्यांतील साम्य विचारात घेण्यासारखे आहे.

"Feix Randal the farrier,
O is he dead then?
my duty all ended,
who had watched
his mould of man,
Big boned and
hardy-handsome"

'रात्रीचा दिवस' ह्या मर्ढेकरांच्या कादंबरीतूनही हाफकिन्सच्या 'Pied beauty' ह्या कवितेतील "Glory be to god for dappled things beauty" ही सुरुवातीची आलेली ओळ मर्ढेकरांवरील हाफकिन्सच्या प्रभावाची साक्ष देण्यास पुरेशी आहे.

**ऑडेनचा प्रभाव** (W. H. Auden)--

ऑडेन हा टी. एस. इलियट आणि डब्लू. बी. यिट्स यांच्यानंतरचा सर्वात महत्त्वाचा आधुनिक इंग्रजी कवी समजला जातो. त्याचा पहिला काव्यसंग्रह १९२८ मध्ये प्रकाशित झाला. त्याच्या कवितेत समकालीन सामाजिक आणि राजकीय वास्तवाचं दर्शन आहे. त्याची कविता मूलतः तर्काधिष्ठित आहे. ऑडेनच्या काव्य–संग्रहाच्या प्रकाशनकाळात मर्ढेकर इंग्लंडमध्येच होते. त्यामुळे ऑडेनच्या नव्या ढंगाच्या कवितेचे स्वागत आणि त्यावरील सार्वत्रिक चर्चा मर्ढेकरांनी निश्चितच अनुभवली असावी. मर्ढेकर इलियटप्रमाणे मुक्तछंदाचा वापर न करता ऑडेनप्रमाणे वृत्तबद्ध रचना करतात. ऑडेनने आपल्या पहिल्या काव्यसंग्रहातील कवितांना शीर्षके न देता केवळ क्रमांक दिले आहेत. ही नावीन्यपूर्व कल्पना मर्ढेकरांनीही आपल्या काव्यसंग्रहासाठी वापरली. वास्तवाचे भान आणि सामान्य माणसासाठी अंतःकरणात असलेली करुणा ही ऑडेनची वैशिष्ट्ये मर्ढेकरांच्याही काव्यात ठळकपणे दिसून येतात. उदाहरणार्थ, मर्ढेकरांचा 'गणपत वाणी' आणि ऑडेनचा 'दी अननोन सिटीझन' यांतील साम्य अगदी सहजगत्या दृष्टोत्पत्तीस येते. बघा

"गणपत वाणी बिडी पिताना।
चावायचा नुसती काडी
म्हणायचा अन् मनाशीच की।
ह्या जागेवर बांधिन माडी
- - - - - - - - - - - - - - -
गणपत वाणी बिडी बापडा।
पितापिताना मरून गेला
एक मागता डोळे दोन।
देव देतसे जन्मांधाला"

आणि

"He was found by bureau of statistics to be
One against whom there was no
official complaint,
And all the reports on his conduct agree
that, in the modern sense of an old fashioned
world he was a saint - - - - -
- - - - He was married and added five children
to the Population.
Which our eugenists say was the right number
for a parent of his generation.
And our teachers report that he
never interfered with their education,
Was he free? Was he happy? the queslition is
absurd :

Had anything been wrong, we should certainly
have heard.

ह्या दोन्ही कवितांमधील आशय, उपहासात्मक शैली, आणि सामान्य माणसाच्या जीवनाचं वर्णन यांतील साधर्म्य सहज लक्षात येईल. दोन्ही कवितांचा नायक एक सामान्य माणूस आहे, जो आपल्या आयुष्यात काहीही करू शकत नाही. ज्याचं जीवन आणि मरण कोणाच्याही लेखी दखलपात्र नसते. तो एक चाकोरीबद्ध जीवन जगतो आणि काहीही उपलब्धी हाती न येता मरून जातो. ह्राच आशय मर्ढेकरांच्या इतर काही कवितांमधूनही व्यक्त होतो.

उदाहरण.– "गिरगावातील गल्लीमध्ये" (का. क. ४५)
"जिथे मारते कांडेवाडी" (का. क. ०३)

**जॉन डनचा प्रभाव**- वास्तविक पाहता जॉन डन हा सतराव्या शतकातला म्हणजे शेक्सपियरचा समकालीन कवी. त्यामुळे मर्ढेकरांवर त्याचा प्रभाव पडण्याचं तसं काहीच कारण काही. पण जॉन डनच्या समग्र काव्याचा संग्रह १९१२ साली पुन्हा प्रकाशित झाला आणि त्याची अलौकिक प्रतिभा, भव्यदिव्य आणि चमत्कारिक कल्पना शक्ती, बौद्धिक सामर्थ्य, अनवट आणि आकर्षक काव्यशैली यांची इलियट, हाफकिन्स, यिट्सच नव्हे, तर तत्कालीन सर्वच लहानमोठ्या कवींवर मोहिनी पडली होती. दोन विषम गोष्टींतील साधर्म्य शोधून त्या गमतीदार पद्धतीने समोरासमोर ठेवण्याची (Juxtapose) विलक्षण किमया डनच्या कवितांत सर्वच दिसून येते, कल्पनातीत प्रतिमांचा प्रयोग, उपहास आणि विडंबनात्मक शैलीने डन आपल्या कवितांमध्ये करतो. उदाहरणार्थ., 'व्हेलेडिक्शन फॉरबिडिंग मोर्निंग', ह्या कवितेत तो दोन प्रेमिकांची तुलना कंपासच्या दोन पायांशी करतो. कंपासला दोन पाय असले, तरी शेवटी ते डोक्याने एकदुसऱ्याशी जोडलेले असतात, अशी ही अफलातून कल्पना. त्याचप्रमाणे 'फ्लि' ह्या कवितेत तो एका क्षुद्र पिसूला 'मधुचंद्राची शय्या आणि मंदिराची' उपमा देतो! का? तर ह्याच पिसूच्या शरीरात दोन प्रेमवीरांच्या रक्ताचं मिलन होतं. अशा तऱ्हेच्या काही भन्नाट कल्पना आणि उपमा मर्ढेकरांच्याही कवितांत बघायला मिळतात. उदाहरणार्थ–

"जशि धोब्याची मऊ इस्तरी।
तलम फिरावी सुतावरूनी,
फाल्गुनातली चंद्रकोर तशी।
मलिन मनाच्या धाग्यावरुनी"

(आ. का. क. १७)

अशा अनेक अनवट प्रतिमा आणि उपमा मर्ढेकरांच्याही कवितांत जागोजागी दिसून येतात. जॉन डन हा मेटॅफिजिकल (म्हणजे तत्त्वज्ञानविषयक किंवा आध्यात्मिक) कवींच्या घराण्याचा संस्थापक मानला जातो आणि तरीही तो इंग्रजी साहित्यातील सर्वश्रेष्ठ विडंबनकवींपैकी एक मानला जातो. डनच्या ह्या विडंबनात्मक कवितांचा आणि शैलीचा प्रभाव मर्ढेकरांच्या कवितांत जागोजागी दिसून येतो. उदाहरणार्थ –

"सर्वे जन्तू रुटिनः।
सर्वे जन्तू निरामयाः।
सर्वे छिद्राणी पचन्तु।
मा कश्चित् दुःख-लॉग् भरेत"!

(आ. का. क. १६)

किंवा- "घनश्याम सुंदरा श्रीधरा
गिरणोदय झाला
उठी लवकर दिनपाळी ........ "
गोंगाटला सारा.

किंवा- "शुभं करोति कल्याणं दारिद्र्यं ऋण-संपही
शुद्धबुद्धी विनाशाय भोंगाकुत्री नमोस्तुते."

त्याचबरोबर मर्ढेकरांच्या काव्यातील ज्या कवितेला मर्ढेकरांचे 'पसायदान' समजले जाते, त्यातील

"भंगु दे काठिण्य माझे।
आम्ल मनीचे जाऊ दे"

या ओळी आणि डनच्या-

"Thy grace may wing me to prevent his art
And thou like adamant draw mine iron-heart"

यांतील साधर्म्य डनच्या प्रभावाची साक्ष देतात.

**प्री-रॅफेलाइट कवींचा प्रभाव**- व्हिक्टोरियन काळाच्या उत्तरार्धात इंग्लंडमध्ये प्री-रॅफेलाइट चळवळीचा उदय झाला. खरेतर ही चित्रकलेतील चळवळ होती. पण ह्या चळवळीतील कलावंत हे कवीदेखील होते. त्यामुळे हीच चळवळ त्यांनी कवितेतही सुरू केली. दान्ते गॅब्रिएल

रोझेट्टी हा त्यांचा नेता होता. त्याच्या पाठीराख्यांत विल्यम मॉरिस, स्विनबर्न, कॉव्हेन्ट्री, पॅटमोर, ऑस्टिन आदी कवींचा समावेश होतो.

ह्या कवींचे वैशिष्ट्य म्हणजे प्रचलित परंपरांपासून मोडता घेणे, एखाद्या प्रसंगाचे किंवा गोष्टीचे अतिसखोल आणि विस्तृत वर्णन करणे (त्यातील एकूणएक बारकाव्यांसह), मध्ययुगीन जीवनातील विविधरंगीपणाचे आकर्षण, विषयासक्ती, शारीर अनुभवांचे बारीकसारीक तपशील देण्याची वृत्ती आणि नादमधुरता. हे गुण मर्ढेकरांच्याही अनेक कवितांत प्रत्ययास येतात. प्री-रॅफेलाइट कवींवर अश्लीलतेचा आणि बीभत्सतेचा आरोप ठेवून त्यांच्यावर टीकेची झोड उडविण्यात आली. मर्ढेकरांवरही अश्लीलतेचे आरोप होऊन त्यांच्यावर चाललेला खटला सर्वविदित आहे. मर्ढेकरांच्या अनेक कवितांत लैंगिक प्रतिमा मुक्तपणे येतात. उदाहरणार्थ-

"चकाकणारे अबलख पिस्टन
हिसके घेती मारीत मिटक्या
संज्ञेवाचून संभोगाची।
अशीच कसरत असते हलक्या" (का. क.४१)
"भरे भुइमूग दाणा।
उपटता स्तन हाले;"
आज येतील का मोड।
माझ्या वालांना चांगले।" (का. क. ५५)
"त्या नाक्यावर तंग हवेली।
उत्साहाची ठिगळ्या चोळी"
घालुनी बसली, बोथटलेली।
शिळी स्तनाग्रे झाकितः
पवळी (आ. का. क. ३)

ही व अशी अनेक उदाहरणे मर्ढेकरांवरील प्रीरॅफेलाइट चळवळीचा प्रभाव दर्शवितात.

मर्ढेकरांच्या काव्यावर इझ्रा पाउंड, किट्स, विल्फ्रेड ओवन यांच्यासारख्या अजूनही काही इंग्लिश कवींचा कमीअधिक प्रमाणात प्रभाव पडलेला असू शकतो, पण त्याबाबत माझ्याजवळ निश्चित पुरावा नाही.

माझ्या ह्या सर्व विवेचनावरून आपल्या मनात मर्ढेकरांनी काय फक्त आंग्लकवींचे अनुकरणच केले की काय, असा संभ्रम निर्माण होणे शक्य आहे. चांगल्या गोष्टींचे अनुकरण ही गोष्ट वाईट नाही. जवळजवळ सर्वच कवी सुरुवातीच्या काळात आपल्या पूर्वसूरींचे अनुकरण करीत असतात. मर्ढेकरांनीही इंग्रजी काव्यप्रवाहातील ज्या ज्या गोष्टी त्यांना भावल्या, पटल्या, त्यांच्या व्यक्तिमत्त्वाशी सुसंगत वाटल्या, त्यांचे थोडेफार अनुकरण केले आहे, पण संपूर्ण नव्हे. कारण मर्ढेकरांवर ज्ञानेश्वरांपासून तुकाराम-रामदासांपर्यंतच्या संतकवींच्या काव्याचा खोल संस्कार झालेला आहे. तोही त्यांच्या अनेक कवितांमधून प्रत्ययास येतो. डार्विनचा उत्क्रांतिवादाचा सिद्धांत हा काव्यालासुद्धा लागू होतो. परंपरेने चालत येणारे काव्य आणि त्यात कालमानानुसार होणारे बदल हे सूक्ष्म आणि मंदगतीने होतात आणि काव्याचा प्रवाह हा परंपरेकडून आधुनिकतेकडे अव्याहत पुढे जात असतो.

पण हा प्रवाह पुढे जात असताना एखादी अशी काही चमत्कारिक आणि अघटित घटना घडते की, तो प्रवाह एकदम अचानक आपली दिशाच बदलतो. ह्याला क्रांतिवादातील डि. व्हाइजचा 'म्युटेशनचा सिद्धांत,' म्हणतात. ह्या सिद्धांताप्रमाणे हे बदल वरवरचे न ठरता ते थेट मानवी पेशीतील जनुकांवरच (genes) होतात आणि विश्वात एका नव्या प्रजातीचा (species) जन्म होतो. मराठी काव्याच्या विश्वातसुद्धा मर्ढेकरांच्या कवितेने एक आमूलाग्र बदल घडवून आणला आणि त्याने, 'नव-काव्य' ह्या एका नव्या प्रजातीचा जन्म झाला. मराठी काव्याला एक नवी दिशा मिळाली. साप कात टाकल्यानंतर ज्याप्रमाणे नव्या जोमाने, नव्या तेजाने संचार करतो, तद्वतच मर्ढेकरांच्या कवितेमुळे मराठी कवितेने आपली जुनी कात टाकली व तिचा प्रवाह अधिक जोमाने, अधिक शक्तीने वाहू झाला.

मर्ढेकरांच्या काव्यात परंपरा आणि नवता यांचा मनोज्ञ संगम दिसून येतो. त्यांच्या काव्यात पौर्वात्य आणि पाश्चिमात्य अशा दोन्ही परंपरांच्या प्रवाहांचे विविध रंग एकमेकांत बेमालूमपणे मिसळून एका नव्या कॅलिडिओस्कोपिक नव-कवितेचे मनोहारी दर्शन घडते.

❖❖❖

# वीणा आलासे आणि कवी अनिल

पंडितराव पवार

वीणा आलासे या मूळच्या मराठी; पण पश्चिम बंगालमध्ये स्थिर झालेल्या सुप्रसिद्ध मराठी आणि बंगाली साहित्याच्या समीक्षक, अनुवादक म्हणून सुप्रसिद्ध होत्या. त्यांचे नुकतेच निधन झाल्याने वरील दोनही भाषांतील साहित्याला जोडणारा अतिशय महत्त्वाचा दुवा निखळला आहे. त्यांनी आपल्या हयातीत विपुल ललित आणि समीक्षालेखन केले. आणि त्याबरोबर त्यांनी मराठीतील साहित्याचे बंगालीमध्ये आणि बंगालीमधील साहित्याचे मराठी भाषेत अनुवाद करून दोनही भाषांतील साहित्याची समृद्धी वाढविली. याचाच अर्थ त्या दोनही भाषांतील साहित्य उत्तम रीतीने जाणत होत्या. त्या रवींद्रनाथ टागोर यांच्या 'विश्वभारती विद्यापीठा'त प्रदीर्घकाळ नोकरी करीत होत्या. तेथील वातावरणाचा परिणाम त्यांच्यावर निश्चितच झाला असणार. त्यातूनच त्यांचे ललित लेखन बहरले असावे. पण त्याहीपेक्षा या नोकरीच्या काळात त्यांनी रवींद्रनाथांचे समग्र साहित्य वाचून, अभ्यासून त्याचे अनुवादही मराठी वाचकांना उपलब्ध करून दिले. त्याचप्रमाणे इतरही बंगाली साहित्याचा अनुवाद करून तो मराठी वाचकांना भरभरून पुरविला. त्यामुळेच नागपूर येथील बंगाली असोसिएशनने त्यांचा या कार्याबद्दल यथोचित गौरव केला होता. कुमार सेन या बंगाली लेखकाच्या 'हिस्टरी ऑफ बेंगॉली लिटरेचर' या इंग्रजी ग्रंथाचा 'बंगाली साहित्याचा इतिहास' असा मराठी अनुवाद वीणा आलासे यांनी केला. तसेच रवींद्रनाथ टागोर आणि महाश्वेतादेवी यांच्या काही साहित्यकृतींचे अनुवाद त्यांनी मराठीत केले. महात्मा जोतिराव फुले यांच्या 'गुलामगिरी' ग्रंथाचा बंगालीत अनुवाद करून फुल्यांचे पुरोगामी विचार बंगाली वाचकांपर्यंत पोचविले. विश्वभारती विद्यापीठाचे कुलगुरू आणि प्रागतिक विचारवंत यांच्या विचारांचा नेटका परिचय त्यांनी 'नवभारत' या सुप्रसिद्ध मासिकातून क्रमशः करून दिला होता. कवी ग्रेस, कवी अनिल आणि ज्येष्ठ समीक्षक डॉ. द. भि. कुलकर्णी यांच्यासह अन्य नामवंत साहित्यिकांच्या कलाकृतींवर केलेली आस्वादक आणि कसदार समीक्षा ही मराठी वाचकांना त्यांनी दिलेली फार मोठी देणगी म्हणावी लागेल. 'रवींद्रनाथ सप्तपर्णी' हा त्यांचा अखेरचा ग्रंथ होय. एकंदरीतच त्या मराठी आणि बंगाली साहित्याच्या व्यासंगी आणि चोखंदळ साहित्यिक होत्या.

मध्यंतरी वीणा आलासे यांनी 'दशपदीचे इतिवृत्त' हा लेख 'दीपोत्सव' (दिवाळी अंक २००८) मध्ये लिहून 'दशपदी' या काव्यप्रकाराबद्दल अधिक माहिती मराठी वाचकांना [illegible]ली आहे. या लेखात त्यांनी कवी अनिलांच्या 'दशपदी' या रचनाप्रकाराआधी बंगाली साहित्यिक द्विजेंद्रलाल रॉय यांनी हा प्रकार साठ वर्षांपूर्वी हाताळल्याचे नमूद केले आहे. या प्रदीर्घ लेखात वीणा आलासे यांनी दशपदी रचनाप्रकारांबद्दल दोनही कवींची भूमिका विशद करून या कवींच्या काव्यवैशिष्ट्यांचे साधर्म्य आणि वैधर्म्यही सोदाहरण स्पष्ट केले आहे. उदा., कवी द्विजेंद्रलाल रॉय यांनी टप्प्याटप्प्याने पन्नास 'दशपदी' कविता लिहिल्या, तर कवी अनिलांनी एकूण चाळीस दशपदी लिहिल्या. या दोनही कवींच्या काव्यलेखनात साठ वर्षांचे अंतर असून दोघांनी आपल्या दशपदी कविता पत्नीनिधनानंतर लिहिल्या. कवी द्विजेंद्रलाल रॉय यांच्या बहुतेक दशपद्यांत पहिल्या/तिसऱ्या आणि दुसऱ्या/चौथ्या ओळींत यमक साधलेला आहे, तर अनिलांच्या दशपद्यांत लागोपाठच्या दोन ओळींत यमक साधलेला दिसतो; पण त्यासाठी त्यांचा अट्टाहास नाही. कवी द्विजेंद्रलाल रॉय यांनी आपल्या दशपद्यांत सर्व विरामचिन्हे योजिली आहेत, तर अनिलांनी कवितेच्या शेवटी फक्त उद्‌गारवाचक चिन्हांचा वापर केलेला आहे. या दोनही कवींचे वैवाहिक जीवन सुखसमृद्धीचे होते. त्याचा परिणाम त्यांच्या लौकिक जीवनावर आणि काव्यरचनेवरही झालेला दिसतो. उभय कवींवर आंग्लकवी ब्राउनिंग यांचा प्रभाव पडलेला जाणवतो. द्विजेंद्रलाल रॉय यांनी छंदाच्या बाबतीत अनेक

प्रयोग केले. 'द्विजेंद्रगीती' ही एक स्वतंत्र गायनपद्धती त्यांनी रूढ केली होती. कवी अनिलांनीही 'मुक्तछंद' रूढ करण्यापूर्वी काही जातिरचनांचे उपयोजन आपल्या कवितेत केले होते.

वरील साम्यस्थळांबरोबरच काही वैधर्म्येही या उभय कवींत त्यांना जाणवली. कवी द्विजेंद्रलाल रॉय यांनी 'दशपदी'चा जाणीवपूर्वक प्रयोग केला आणि तसे नमूदही केले. कवी अनिलांना काव्यरचनेत प्रयोग मान्य नव्हते. कविता घडविण्यापेक्षा घडलेली असावी, अशी त्यांची धारणा होती. कवी द्विजेंद्रलाल रॉय यांचे कर्मजीवन फारसे सुखी नव्हते. याउलट, कवी अनिलांचे जीवन सुखाचे आणि मानसन्मानांत व्यतीत झाले होते. कवी द्विजेंद्रलाल रॉय रवींद्रनाथांचे समकालीन होते; पण त्यांना त्यांच्या साहित्याबद्दल आकर्षण वाटत नव्हते. उलट, कवी अनिलांनी रवींद्रनाथ टागोरांचा सौंदर्यवाद, आनंदवाद आपल्या जीवनात मुरवून घेतला होता. द्विजेंद्रलाल रॉय हे बहुआयामी साहित्यिक होते. त्यांनी कविता, गद्यलेखन, तुलनात्मक निबंध, पत्रलेखन, इंग्रजी कविता इ. लेखन केले होते. कवी अनिलांनी सात कवितासंग्रह, काही समीक्षालेख आणि वैयक्तिक प्रेमपत्रे एवढे लेखन केले आहे.

वीणा आलासे यांनी कवी द्विजेंद्रलाल रॉय आणि कवी अनिल यांच्या काव्यरचनांबाबत वरील मते सविस्तर मांडली आहेत; पण त्यांनी या उभय कवींबाबत आणखी एक भूमिका मांडली आहे आणि ती भूमिका म्हणजे, हे दोनही कवी 'आपापल्या भाषांतील प्रथमश्रेणीचे प्रतिभावंत नाहीत' आणि 'उभयतांच्या काव्यांत व्यंजनशक्तीचा अभाव जाणवतो.' वरील दोनही विधाने तपासली म्हणजे लक्षात येते, की द्विजेंद्रलाल रॉय यांच्याप्रमाणे कवी अनिलांच्या प्रतिभाशक्तीवर आणि कवितेवर ती अन्याय करणारी वाटतात. कवी द्विजेंद्रलाल रॉय यांची कविता मी वाचलेली नसल्याने त्यासंबंधी भाष्य करण्याच्या मला मर्यादा आहेत; पण कवी अनिलांच्या संदर्भातील विधाने मलाच काय, पण काव्यरसिकांनाही मान्य होण्यासारखी नाहीत.

कवी अनिल हे एक प्रतिभावंत कवी होते. युगधर्म ओळखून त्यांनी आपली कविता लिहिली. केशवसुत-संप्रदाय क्षीण झाला तेव्हा मराठी कवितेला मरगळ आली होती. त्या वेळी अनिल, कुसुमाग्रज, बोरकर या तीन प्रमुख प्रतिभावंत कवींनी मराठी कवितेला वेगळे आयाम मिळवून दिले. कवी अनिलांनी एकाच वेळी आत्मनिष्ठ आणि वस्तुनिष्ठ कविता लिहून मानवतावादी कवी म्हणून लौकिक मिळविला. स्फुट अल्पाक्षरी कविता आणि प्रदीर्घ आशयाची चिंतनशील कविता त्यांनी लिहिली. ती विविध विद्यापीठांत आजही अभ्यासली जाते. त्यांच्या काही कविता ज्येष्ठ संगीतकार यशवंत देव यांच्या संगीतातून पु. ल. देशपांडे, कुमारगंधर्व, उषा मंगेशकर व इतर प्रसिद्ध गायकांनी सुरेल आवाजात गाऊन जनमानसात पोचविल्या, हे त्यांच्या अम्लान आणि उच्च श्रेणीच्या प्रतिभेचे लक्षण नाही काय? उलट, या प्रतिभावंत कवीचीही ज्ञानपीठ पुरस्कारासाठी योग्यता होती, असे म्हटले तर वावगे ठरू नये. त्यांनी रूढ केलेला 'मुक्तछंद' आणि 'प्रक्षोभरसाची' स्थापना हे त्यांच्या अलौकिक प्रथमश्रेणीच्या प्रतिभेचे द्योतक नाही काय? त्यांच्या तरल प्रतिभेतून प्रकटलेल्या 'दशपदी'ला साहित्य अकादमी पुरस्कार मिळाला हे त्यांच्या श्रेष्ठ प्रतिभेचे लक्षण नाही का? मराठीतील सर्व नामवंत समीक्षकांनी त्यांच्या कवितेचा गौरव केला, हे अनिलांच्या प्रथमश्रेणीच्या प्रतिभेचे निदर्शक आहे.

अनिलांच्या कवितेत 'व्यंजनशक्तीचा अभाव प्रकर्षाने जाणवतो', हे विधानही त्यांच्या कवितेवर अन्यायकारक आहे. एवढेच नव्हे, ते ती कवितेचा मूल्यभ्रम आणि रसिकांचा अभिरुचिभ्रम करणारे आहे. वरवर पाहता त्यांची कविता साधीसोपी असली, तरी योग्य ठिकाणी उच्च दर्जा आणि व्यंग्यार्थासह प्रकट होते. प्रत्येक कवीची स्वतंत्र शैली असते. तिच्या व्यक्तित्वाचे दर्शनही त्यांच्या कवितेत घडते. कवी अनिल हे एक प्रथितयश आणि नामवंत कवी असल्याचे वीणा आलासे यांना चांगलेच ज्ञात असूनही त्यांनी त्यांच्या समग्र कवितेचे एक प्रकारे अवमूल्यन केले आहे. मराठी कवितेत गूढतेचे वलय निर्माण करणाऱ्या कवी ग्रेस यांच्या कवितेचे सौंदर्य विविध अंगांनी उलगडून दाखविण्याऱ्या या जाणकार समीक्षिकेला अनिलांच्या कवितेतील व्यंजनाशक्ती

जाणवली नाही, हे एक गूढच वाटते. हा त्यांचा वैयक्तिक दृष्टिकोण असला, तरी रसिकमान्य कवी अनिलांच्या कवितेचे श्रेष्ठत्व अबाधित आहे.

'फुलवात' हे काव्यसंग्रहाचे शीर्षक प्रेमाच्या मांगल्याचे प्रतीक आहे. 'हृदयाच्या अंधारात' लावलेली फुलवात नंतर 'हृदयाच्या मंदिरात' शाश्वत प्रेमाचे तेज उजळते, ही सूचकता विचारात घेण्यासारखी आहे. 'झळ' कवितेतील युद्धजन्य परिस्थितीचा परिणाम संवेदनशील कविमनावर होतो आणि कवी म्हणतो, 'किती दूरचि लागे झळ। आतल्या जीवा। केळीचे सुकले प्राण। बघुनि भवताली' या काव्यपंक्तींतील वाच्यार्थावरून वरील व्यंग्यार्थ सहजपणे कळणार नाही. तसेच 'पेर्ते व्हा' कवितेतील 'पेरा पेरा पेरा। नव बीजे पेरा। नव्या आशा धरा। पेरते व्हा पेरते व्हा' या गतिमान ओळी नवजीवनाचा, आशावादाचा संदेश देणाऱ्या आहेत. यातील नवसृजनाचा ध्वन्यर्थ वरवर सोप्या वाटणाऱ्या शब्दांतून कळत नाही. तसेच 'रुसवा' कवितेतील, 'कां भावली मिठाची अश्रूंत होत आहे। विरणार सागरी ह्या जाणून दूर आहे' या गूढ ओळींचा ज्ञानेश्वरांच्या 'अमृतानुभवा'तील सागराचे पाणी आणि मीठ यांच्या अद्वैताशी संबंध आहे. त्यातील व्यंग्यार्थ कवी अनिलांचा सखोल व्यासंग समजल्याशिवाय समजणार नाही.

कवी अनिलांची 'श्रावणझड' मधील निर्मितिपूर्व मग्न अवस्था वरवर वाचून कळत नाही. 'संमोहन निद्रेतून शब्दांना जाग नसे' या निमग्न अवस्थेतील व्यंग्यार्थ लक्षात येणे अवघड आहे. 'उशिराचा पाऊस' या कवितेतील 'असा उशिरा आलेला पाऊस तळहातावर झेलून घ्यावा', या ओळीतील वाच्यार्थ कळतोच; पण उशिरा आलेला प्रेमाचा किंवा अन्य घटनांचा सूचित अर्थही येथे पहावा लागतो. कोणत्याही गोष्टीला वेळ यावी लागते. 'तुका म्हणे तेथे न चाले तातडी। प्राप्तकाळ घडी आल्याविणा' हाच ध्वन्यर्थ अनिलांना वरील कवितेतून सुचवायचा दिसतो. त्यांच्या 'दाद' या दशपदीतील 'कळवाल का त्या कोकीळा की झार होती वाढली, आणि द्याया दाद कोणी रात्र जागुनी काढली'

या काव्यपंक्तींतील कोकीळ आणि त्याची दर्दभरी झार म्हणजे कवीचीच एकाकीपणातील विरहावस्था आहे.

हा अनिलांच्या शब्दांत प्रतीयमान अर्थ आहे.

त्यांचे 'भग्नमूर्ती' हे काव्य तर भारतीय संस्कृतीचे व्यापक रूपक आहे. वरवर सोप्या वाटणाऱ्या या विचारप्रधान काव्यात भारतीय संस्कृतीच मुळापासून उखडली जाण्याचा धोका कवीस वाटतो. आणि सूचितार्थ कवी परोपरीने आणि तळमळीने सुचवीत आहे. 'विचारांनी भावनेचे अंकुर फोडून त्यास कार्यप्रवण करणारे असे जीवनोपयोगी तत्त्वज्ञान काव्यातून परिणामकारक रीतीने सांगता व सुचविता येणे' ही अनिलांची भूमिका महत्त्वाची आहे. तत्त्वज्ञान 'सुचविता' येणे हा लक्ष्यार्थ्यांच्या पलीकडचा व्यापक व्यंग्यार्थच आहे. अनिलांच्या 'जुई', 'गाठ', 'काळी', 'कोंबडा' अशा कितीतरी कविता वरवर सोप्या वाटल्या, तरी त्यांतील कवीचे काळापुढे पाहण्याचे भान आणि सूक्ष्म निरीक्षण व्यंग्यार्थसूचक आहे. वरील उदाहरणे ही प्रातिनिधिक आहेत. त्यामुळे वीणा आलासे यांचे 'अनिलांच्या कवितेत व्यंजनशक्तीचा अभाव प्रकर्षाने जाणवतो', हे विधानही पटत नाही. त्या विधानातील 'प्रकर्षाने' हा शब्द तर अनिलांच्या समग्र कवितेला अदखलपात्र करणारा आहे. त्यांनी वरील विधाने गैरसमजातून किंवा विशिष्ट मानसिक अवस्थेतून केली असावीत, अशी शंका वाटते. काहीही असले, तरी त्यांनी कवी द्विजेंद्रलाल रॉय आणि अनिलांचे काही साहित्यिक पैलू उजेडात आणले, हेही नसे थोडके. कवी अनिलांनीच आपल्या शेवटच्या 'आता आनंदाचे दिस'मध्ये खिलाडूपणे म्हटले आहेच, की माझ्या कवितेत 'कुणी यश शोधतील कुणी हार मानतील'; यातच माझ्या जीवनाचे आणि कवितेचेही मोजमाप होईल.

❖❖❖

# राष्ट्रपती वटहुकमाची संसदीय प्रासंगिकता

व्ही. डी. गायकवाड

सध्या भारतीय राजकारण्यांच्या चर्चाविश्वात चर्चिला जाणारा विषय राष्ट्रपतीचा वटहुकूम किंवा अध्यादेश होय. भारताचे राष्ट्रपती मा. प्रणव मुखर्जी यांनी १ जाने. २०१५ ला देशातील उच्च शिक्षण देणाऱ्या केंद्रीय संस्थेतील विद्यार्थ्यांना 'Parliament & Policy Making' या विषयावर उद्‌बोधन करताना संसदेच्या कायदानिर्मिती अधिकारासंदर्भातील राष्ट्रपतीचा वटहुकूम याच्या वापराबद्दल चिंता व्यक्त केलेली आहे. त्यांच्या मते, अलीकडील काळात संसदीय लोकशाहीत असंसदीय प्रथांचा वापर मोठ्या प्रमाणात वाढत चाललेला आहे. विशेषतः गेल्या काही वर्षांपासून संसदेच्या कायदानिर्मिती प्रक्रियेतील कार्यकारी मंडळाचा हस्तक्षेप किंवा राष्ट्रपतींनी अध्यादेश काढण्याचे प्रमाण वाढलेले आहे. या संदर्भात राष्ट्रपतींनी आपल्या उद्‌बोधन व्याख्यानात देशातील सर्व लोकशाहीप्रेमींसमोर जाहीर चिंता व्यक्त केलेली आहे. त्या अनुषंगाने या लेखात राष्ट्रपती वटहुकूम, यासंबंधी सविस्तर चर्चा करण्यात आलेली आहे.

लोकशाहीप्रधान देशात कायदानिर्मितीची प्रक्रिया ही कायदेमंडळाकडे सोपविलेली असते. त्यानुसार कायदेमंडळ कायदा करते. कायदानिर्मितीच्या या प्रक्रियेत कार्यकारी मंडळाचाही सहभाग असतो. राष्ट्रपतींच्या सहीशिवाय विधेयकाचे रूपांतर कायद्यात होतच नाही. राष्ट्रपतींचा वटहुकूम हा कायदेनिर्मितीच्या प्रक्रियेतील (अपवादात्मक) एक भाग आहे. पण इतर संसदीय देशांत हा अधिकार क्वचितच राष्ट्राध्यक्षाला देण्यात आलेला आहे. भारतात मात्र जाणीवपूर्वक राज्यघटनेने वटहुकूम काढण्याचा अधिकार हा राष्ट्रपतीला दिलेला आहे, जो राष्ट्रकुल संघटनेत केवळ भारताच्या राज्यघटनेतच दिसून येतो. अमेरिका व इंग्लंडमध्ये अप्रत्यक्ष रीत्या सत्ताविभाजनाच्या सिद्धान्ताचा पुरस्कार केल्यामुळे कायदेनिर्मितीचा अधिकार तिथे फक्त कायदेमंडळालाच दिलेला आहे. भारतात मात्र वटहुकमाच्या माध्यमातून अपवादात्मक परिस्थितीत हा अधिकार राष्ट्रपतीला दिलेला आहे.

भारतीय राज्यघटनेतील क. १२३ (१) नुसार राष्ट्रपतीला वटहुकूम काढण्याचा अधिकार दिलेला आहे. पण या अधिकाराचा वापर फक्त आणीबाणीसदृश किंवा अनिवार्य परिस्थितीतच म्हणजेच 'Immediate Action 123 (1)' अंतर्गत करता येतो. या तरतुदीनुसार संसदेचे अधिवेशन चालू नसेल तेव्हा देशात आणीबाणी नसून आणीबाणीसदृश परिस्थितीत प्राप्त कायदा उपयोगी पडत नसेल किंवा नवीन कायदा करणे किंवा समाजहिताच्या दृष्टीने एखादे विधेयक संसदेत कायदा निर्माण करण्यासाठी प्रलंबित असेल किंवा तातडीची उपाययोजना म्हणून कायद्याची गरज असेल, तेव्हा पुढील परिस्थितीत राष्ट्रपती वटहुकूम काढू शकतात-संसदेचे अधिवेशन संपलेले आहे, विधेयक संमतिविना प्रलंबित असेल, संसदेत विशेषतः दुसऱ्या सभागृहात सरकारचे बहुमत नसेल, विरोधी पक्षाच्या आडमुठेपणामुळे संसदेच कामकाज न होता सत्र संपलेले असेल, विरोधी पक्षाचा त्या विधेयकासंदर्भात आक्षेप असेल. अशा परिस्थितीत राष्ट्रपतीने स्वतःच्या विवेकाने खात्री करून घेतल्यास व पंतप्रधानाच्या अध्यक्षतेखालील मंत्रिसमितीने तशी शिफारस केल्यास राष्ट्रपतीला व राज्यात (क. २१३) नुसार राज्यपालाला वटहुकमाचा अध्यादेश काढता येतो. ह्या अध्यादेशास कायदेमंडळाने तयार केलेल्या कायद्याइतकाच दर्जा असतो. आतापर्यंत भारताच्या संसदीय इतिहासात ६३७ अध्यादेश काढण्यात आलेले आहेत. वरील वस्तुस्थिती ही संविधानात सांगितलेल्या नियमाप्रमाणे आहे आणि याचा वापर अपवादात्मक परिस्थितीतच व्हायला पाहिजे, हीच संसदीय नैतिकता आहे. पण आतापर्यंतच्या वटहुकमांची वस्तुस्थिती पाहता राष्ट्रपतीच्या या अधिकाराचा कार्यकारी मंडळाकडून म्हणजेच सरकारकडून असंसदीय, पर्यायी व्यवस्था,

विरोधी पक्षाचे महत्त्व कमी करण्यासाठी म्हणून वापर करण्यात आलेला आहे. अलीकडच्या काळात आघाड्यांची सरकारे, संसदेतील निश्‍चित बहुमताचा अभाव व संसदेचे कामकाज न होणे या कारणांमुळे वटहुकमाचा वापर करण्याकडे कल वाढलेला आहे. पण पं. जवाहरलाल नेहरू व इंदिरा गांधी यांनी संसदेच्या दोन्ही सभागृहांत बहुमत असतानाही वटहुकमाचा वापर केलेला दिसून येतो. पुढील आकडेवारीवरून आतापर्यंत कोणकोणत्या पंतप्रधानाच्या काळात वटहुकमाचा वापर किती झालेला आहे, तो तक्ता पहा.

परिस्थिती उद्भवल्यास प्रशासनाच्या सोयीसाठी गव्हर्नरला असे कायदानिर्मितीचे स्थानिक अधिकार दिलेले होते. पण भारताला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर भारताने लोकशाहीचा व संविधानाचा पुरस्कार केला म्हणून त्या काळात भारतीय नेत्यांकडून ब्रिटिश शासनाला वटहुकमाचे राज्य असे संबोधले जायचे. शासनाच्या तिन्ही शाखा आपापल्या अधिकारांबाबत स्वतंत्र ठेवणे गरजेचे होते; पण आपल्या घटनाकर्त्यांनी देशाची सामाजिक, आर्थिक व राजकीय परिस्थिती समोर ठेवून देशाच्या सोयीच्या काही संसदीय/संसदबाह्य तरतुदी संविधानात समाविष्ट केला.

| अ.क्र. | पंतप्रधानाचे नाव | लोकसभा | लोकसभेचा कार्यकाल | राष्ट्रपती वटहुकमांची संख्या |
|---|---|---|---|---|
| १. | पं. नेहरू | १ ली व २ री लोकसभा | १९५२ ते १९५७<br>१९५७ ते १९६२ | ५९ |
| २. | इंदिरा गांधी | ४ थी, ५ वी व ६ वी लोकसभा | १९६[illegible] ते [illegible]८४ | १९५ |
| ३. | राजीव गांधी | ८ वी लोसभा | १९८४ ते १९८९ | ३५ |
| ४. | पी. व्ही. नरसिंहराव | १० वी लोकसभा | १९९६-९९ | ७५ |
| ५. | अ. बि. वाजपेयी | १२ वी १३ वी लोकसभा | १९९८ ते २००४ | ५८ |
| ६. | डॉ. मनमोहन सिंग | १३ वीं १४ वी लोकसभा | २००४ ते २०१४ | ५१ |
| ७. | नरेंद्र मोदी | १६ वी लोकसभा | २०१४ ते चालू... | ८ |

स्रोत : विनायक राजशेखर www.presindia.org

वरील तक्त्यातील माहितीचे निरीक्षण करता सर्व पंतप्रधानांच्या काळात वटहुकूम काढण्याचा प्रयत्न झालेला आहे. आतापर्यंत ६३७ म्हणजे प्रतिवर्ष ११ वटहुकूम काढण्यात आलेले आहेत. संसदेत बहुमत असो अथवा नसो, वटहुकूम काढण्याची प्रवृत्ती वाढायला लागलेली आहे. याबद्दलच राष्ट्रपतींनी चिंता व्यक्त केलेली आहे. मुळात वटहुकमाची तरतूद राज्यघटनेत घटनाकर्त्यांनी चांगल्या उद्देशाने केलेली होती. या वटहुकमाचा उगम पाहता हा स्वातंत्र्यपूर्व काळात भारत संघराज्य कायदा १९३५ मध्ये गव्हर्नर जनरलला क. ४२ व ४३ नुसार वटहुकूम काढण्याचा अधिकार देण्यात आलेला होता. त्याचे कारण स्वातंत्र्यपूर्व काळात भारताची पार्लमेंट इंग्लंडमध्ये होती. भारतविषयक सर्व कायदे ब्रिटिश पार्लमेंटमध्ये संमत केले जात असत. तेव्हा आणीबाणीची

तसेच स्वतंत्र भारताच्या संविधानावर १९३५ च्या कायद्याचा बराच प्रभाव आहे, म्हणून ही तरतूद तशीच पुढे चालू ठेवण्यात आली. घटना परिषदेत पं. हृदयनाथ कुंजरू व के. टी. शहा यांनी या वटहुकमास विरोध दर्शविलेला होता. पण या संदर्भात घटनाकर्ते डॉ. बाबासाहेब आंबेडकर यांनी या तरतुदीचे जोरदार समर्थन केलेले दिसून येते. त्यांच्या मते ही तरतूद म्हणजे 'Necessary to take immediate action' होय.

संविधानातील या तरतुदीचा वापर मोठ्या प्रमाणात वाढलेला आहे. हा मार्ग सरकारने कितपत वापरावा व वापरू नये, या संदर्भात अनेक मतभेद आहेत. सर्वसाधारणपणे अपवादात्मक परिस्थिती असेल, कायदा करणे गरजेचे आहे व राष्ट्रपतीला स्वत: तशी खात्री वाटलेली असेल, तर वटहुकूम काढता येतो. पण

राष्ट्रपतीला तशी खात्री किंवा निकड वाटत नसेल, तर सरकारला राष्ट्रपती वटहुकमावर फेरविचार करण्यास सुचवू शकतात. पण मंत्रिमंडळाचा सल्ला राष्ट्रपतींना मान्य करावाच लागतो. विशेषतः राज्यातील राज्यपालांनी अनेक वटहुकूम काढण्याचे नाकारले आहेत किंवा राष्ट्रपतीच्या विचारार्थ ठेवलेले आहेत. उदा., महाराष्ट्राचे तत्कालीन राज्यपाल एस. एम. कृष्णा यांनी मुंबई पोलिसांचा डान्स बारबंदीचा सरकारचा अध्यादेश फेरविचारार्थ परत मंत्रिमंडळाकडे पाठवलेला होता. आणीबाणीसदृश परिस्थितीत अनेक वटहुकूम काढण्यात आलेले आहेत व ते योग्यही आहेत. ते योग्य असण्याची पुढील कारणे देता येतील–देशाचे आर्थिक नुकसान होत असेल; उदा., परकीय व्यापार व गुंतवणूक संदर्भातील वटहुकूम, देशांतर्गत तातडीची परिस्थिती, संसदेच्या दुसऱ्या सभागृहात सरकारचे बहुमत नसेल पण तातडीचा विषय असेल तर.

वरील अपवादात्मक परिस्थितीत अध्यादेश काढला जावा. तो समर्थनीय आहे व न्यायालयीन पुनर्विलोकनाच्या क्षेत्राबाहेरचाही असतो. वटहुकूम न काढताही सरकारला एखाद्या विधेयकाची आवश्यकता असेल तर संविधानात विशेष तरतूद करण्यात आलेली आहे; ती म्हणजे संसदेचे संयुक्त अधिवेशन बोलावणे (क. १०८). पण संयुक्त बैठक बोलावणे हा मार्ग अव्यवहारार्य तसेच खर्चिक आहे. घटनेतील क. १०८ नुसार राष्ट्रपतीला संसदेचे संयुक्त अधिवेशन बोलवता येऊ शकते. या संयुक्त अधिवेशनात सरकारकडे विधेयक पास करण्यासाठी दुसऱ्या सभागृहात बहुमत नसले तरी सामान्य विधेयक पास करता येते (अपवाद–अर्थविधेयक व घटनादुरुस्ती विधेयक). पण भारताच्या संसदीय इतिहासात आतापर्यंत केवळ ४ वेळाच संसदेचे संयुक्त अधिवेशन बोलावण्यात आलेले आहे. सर्वसाधारणपणे वटहुकमाऐवजी तो एक संसदीय पर्याय उपलब्ध आहे. वटहुकमाचे स्वरूप पुढीलप्रमाणे–

वटहुकूम हा संसदेचे अधिवेशन नसतानाच्या काळातच काढता येतो, वटहुकूम हा पुढच्या संसद अधिवेशनात म्हणजे ६ महिन्यांपर्यंत वैध असतो. अधिवेशन चालू झाल्यास ६ आठवड्यांत तो मंजूर करून घ्यावा लागतो. संसदेत वटहुकमासंबंधी विधेयक दाखल झाले पाहिजे. तातडीची कृती म्हणून वटहुकूम निघतो. राष्ट्रपतीला तशी खात्री वाटली पाहिजे. वटहुकमाचा अधिकार हा न्यायालयीन क्षेत्राच्या बाहेर आहे. वरील परिस्थितीतच वटहुकमाची वैधता मानली जाते.

वरील सर्व माहितीचा आधार घेता वटहुकमाचा वापर कार्यकारी मंडळाने करणे उचित किंवा अनुचित होऊ शकते; पण या मार्गाचा साधारण परिस्थितीत वापर करणे मात्र असंसदीय लोकशाही मार्ग आहे. या संदर्भात सर्वोच्च न्यायालयाने आपल्याच एका खटल्यात D. C. Wadhawa and Other V/s Bihar State & Others (1987) वटहुकमाच्या वापरास नापसंती व्यक्त करताना त्यास त्यांनी 'Constitutional Fraud' हा शब्दप्रयोग वापरलेला आहे.

राष्ट्रपती प्रणव मुखर्जी यांच्या म्हणण्याचाही रोख तोच आहे की, संसदेच्या सर्व सभासदांनी राजकारण बाजूला ठेवून राष्ट्रहिताच्या संदर्भातील विधेयके कुठलाही राजकीय पूर्वग्रह न ठेवता संमत करायला पाहिजेत. सभागृहात बहुमत नसणे ही तांत्रिक बाब आहे. तेव्हा विरोधी पक्षांनीही राजकारण न करता राष्ट्रहिताचा विचार करून सहकार्य करावे व सरकारनेही वारंवार सांविधानिक बाबींचा गैरवापर करू नये, ज्यामुळे चुकीचे पायंडे पाडू शकतात. दुसऱ्या सभागृहात बहुमत नाही याचे केवळ भांडवल करून सर्वसाधारण परिस्थितीत वटहुकूम काढणे योग्य नाही. तसेच आंतरराष्ट्रीय व्यापार, गुंतवणूक, आर्थिक हित, एखाद्या धोरणाचे देशांतर्गत व देशाबाहेरील परिणाम इ. गांभीर्य ठेवून समंजस पद्धतीने संसदीय मार्गाचा वापर व्हायला हवा, हेच राष्ट्रपतीच्या भाषणातून सूचकपणे दिसून येते.

**संदर्भ**

1) Acharya P. D. (2015), ***'Its no ordinance raj'***, http:// www. indian express.

2) - (2015) ***'Ordinance only to meet exgiences compelling circumstances : President'*** http:// www. indianews.yahoo.com

3) - (2015) ***' President Pranav Mukherjee dosent favour ordinance route'*** http:www.

timesofindia.indiatimes.com

4) - (2013) ***'Ordinance route'***, Frontline print edition 9 Aug. 2013.

5) - (2015) ***'Ordinance in Indian Constitution'*** http://www. legalhelplineindia.com

6) - (2012) ***'Powers of the governor in enacting*** laws and promulgation ordinaces ***under the constitution of India'***, http://www.shodganga.inflebnet.ac.in/bestreams.

❖❖❖



अनुक्रमणिका

# पुरुषसूक्ताचा आधुनिक अर्थ

अनिलकुमार भाटे

नुकतीच आषाढी एकादशी झाली. त्यामुळे एक वर्षांपूर्वी विठ्ठलमंदिरातील पूजेला डॉ. पाटणकरांनी घेतलेल्या हरकतीची आठवण झाली. ''पंढरपूरच्या विठ्ठलाच्या पूजेला जातीयवादी रंग चढविणारे मंत्र बदलावेत, अन्यथा आषाढी एकादशीच्या दिवशी मुख्यमंत्र्यांना सरकारी महापूजा करू देणार नाही,' अशी घोषणा डॉ. भारत पाटणकरांनी केली होती. त्यावर भागवताचार्य वा. ना. उत्पात यांनी दुसऱ्या दिवशी असा खुलासा केला की, ''विठ्ठलाच्या पूजेच्या वेळी म्हटल्या जाणाऱ्या 'पुरुषसूक्ता'मध्ये जातिव्यवस्थेबाबत कोणतेही चुकीचे मंत्र नाहीत. मंत्रांचा चुकीचा अर्थ लावून वाद निर्माण केला जात आहे." पुरुषसूक्ताचा नक्की अर्थ काय आहे, याचा माझ्या अभ्यासाला अनुसरून मी जो विचार केला आहे, तो या लेखात मांडत आहे.

विठ्ठलाच्या पूजेच्या वेळी म्हटले जाणारे पुरुषसूक्त ऋग्वेदामधले आहे. मात्र पुरुषसूक्त फक्त ऋग्वेदातच आहे, असे नाही. इतर तीन वेदांतही पुरुषसूक्त आहे आणि तैत्तिरीय आत्मकामध्येही ते सापडते. इतर अनेक ब्राह्मणग्रंथांतून व उपनिषदांतूनही पुरुषसूक्ताचे उल्लेख येतात. यावरून हे स्पष्ट होते की, पुरुषसूक्त हे वेदकालीन विचारविश्वात फार महत्त्वाचे गणले गेले होते. अर्थात इतक्या निरनिराळ्या ठिकाणी आलेले पुरुषसूक्त हे एकच आहे, असे नाही. पण या सर्व पुरुषसूक्तांना एकच गोष्ट सांगायची आहे, ती म्हणजे सर्वशक्तिमान परमेश्वराची थोरवी.

'ऑण्टॉलॉजी' हा पाश्चात्त्य तत्त्वज्ञानातील महत्त्वाचा शब्द आहे. त्याचा अर्थ 'सार्वत्रिक आणि सर्वंकष वास्तवाचे स्पष्ट वर्णन', असा आहे. वेदांतले सर्व तत्त्वज्ञान ही खरेतर 'ऑण्टॉलॉजी'च आहे. वेदांतील चार महावाक्यांपैकी एक महावाक्य 'सर्वम् खल्विदं ब्रह्मम्' असे आहे. ते वाक्य निर्विवादपणे दाखवून देते की, वेद हे वास्तवाचे स्पष्ट वर्णन करण्याची आकांक्षा धरतात. या 'ऑण्टॉलॉजी' ने (म्हणजे वेदांनी) वर्णिलेले जे काही आहे, ते सर्व आपल्यात सामावून घेऊन जो 'दशांगुळे' शिल्लक उरला, त्या विश्वपुरुषाची महती पुरुषसूक्तामध्ये सांगितली आहे.

'पुरुषसूक्ता' त चातुर्वर्ण्याचा उल्लेख केवळ अनुषंगाने आला आहे. त्यात जातींचा उल्लेख अजिबात नाही. जात ही जन्मावरून ठरते तर वर्ण हा गुणकर्मानुसार ठरतो, असे श्रीकृष्णानेच सांगितले आहे. आपण चातुर्वर्ण्याची जी कल्पना आज मानतो, ती बरीचशी विपर्यस्त आहे. आपण 'क्षत्रिय' याचा अर्थ 'लढाऊ' असा करतो. पण क्षेत्र म्हणजे शेत किंवा शरीर. क्षत्रिय म्हणजे शेत करणारा किंवा शरीराचे रक्षण करणारा; म्हणजेच शेतकरी किंवा स्वसंरक्षणाचे सामर्थ्य असणारा. 'पुरुषसूक्ता'त क्षत्रिय हा शब्द वापरलेला नाही; तर राजन्य हा शब्द वापरला आहे. परमेश्वराला हजारो हात, पाय, कान, डोळे आहेत, असे त्याचे 'पुरुषसूक्ता'त वर्णन केले असून ब्राह्मणवर्ण मुखातून, राजन्य वर्ण बाहूंतून, वैश्य वर्ण मांडीतून व शूद्र वर्ण पायांतून उगम पावला असे, म्हटले आहे. यात जातींचा कुठेच उल्लेख नाही.

प्रत्येक व्यक्ती ही ''मन-शरीर'' यांची जोडी असते. या ''मन-शरीर" जोडीची जी अंतर्गत रचना असते, त्या रचनेचा विचार चार गुणधर्मांच्या अंगाने करता येतो. हे चार गुणधर्म म्हणजे चार वर्ण होत. मी जेव्हा प्राध्यापक म्हणून वर्गात भाषण करतो, तेव्हा माझ्यातील ब्राह्मण वर्ण कार्यान्वित होतो. मी घरात शिरलेल्या चोरामागे काठी घेऊन धावतो तेव्हा माझ्यातील राजन्य वर्ण पुढे सरसावतो. मी पगार घेतो व बाजारातून वस्तू विकत आणतो, तेव्हा मी वैश्य वर्णाचा अंगीकार करतो. मी केरवारे, धुणी-भांडी इत्यादी घरकाम करतो, तेव्हा माझ्या ठिकाणचा शूद्रवर्ण प्रकर्षाने कार्य करीत असतो.

माझ्या ठिकाणी चारही वर्ण आहेत आणि मी त्या

अनुक्रमणिका

विश्वपुरुषाचीच एक लघु-आवृत्ती आहे. माझ्यातले चार वर्ण विश्वपुरुषाच्या कोणत्या अवयवांशी संलग्न आहेत हे दाखविण्यासाठी 'पुरुषसूक्तां'त ब्राह्मण आणि विश्वपुरुषाचे मुख इत्यादी संबंध जोडून दाखविले आहेत. याचा समाजरचना, जाती इत्यादींशी संबंध नाही, तसेच उच्च-नीचत्वाशीही संबंध नाही.

आपण जर विठ्ठलाला विश्वपुरुषाचे रूपक म्हणून मानत असू, तर 'पुरुषसूक्त' हे त्याचे वर्णन करणारे स्तोत्र आहे. त्यामुळे विठ्ठलाच्या पूजेच्या वेळी पुरुषसूक्त म्हणण्यात काहीच गैर नाही. ❖❖❖

## लेखकांचा परिचय


- **गणेश उमाकांत थिटे**

  सेवानिवृत्त संस्कृत विभाग प्रमुख , प्राध्यापक, संस्कृत विभाग, सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ..
  ***पत्ता :*** २१, एरंडवणा, गावठाण, मेहेंदळे गॅरेजजवळ, पुणे-४११ ००४
  भ्रमणध्वनी : ९८२२९१२०८१.

- **प्रा. श्री. मा. भावे**

  माजी प्रपाठक व विभागप्रमुख, गणित विभाग, नौरोजी वाडिया कॉलेज, पुणे; गणित व तत्त्वज्ञान या विषयांत पीएच. डी. व पदव्युत्तर संशोधन; शिक्षकचळवळीत सहभाग; शिक्षण, गणित व तत्त्वज्ञान या विषयांवर २५ शोधनिबंध.
  ***पत्ता :–*** ३३/२०, ४ थी गल्ली, प्रभात रोड, पुणे – ४११००४. दूरध्वनी :- (०२०) २५६७४०९३.

- **श्री. अनिल शेंडे**

  बी. एस. सा, एम. ए. इंग्लिश लिटरेचर. बॅचलर ऑफ मास्क कम्युनिकेशन. राष्ट्रभाषा हिंदी कोविद. विदर्भात कवी म्हणून प्रसिद्ध. चार काव्यसंग्रह प्रसिद्ध. विविध विषयांवर शोधनिबंध प्रसिद्ध.
  ***पत्ता :–*** 'अद्वैत', १५७ अ, अंबाझरी हिल टॉप, नागपूर – ४४००१०.
  भ्रमणध्वनी : ९८६०३०७४६२.

- **प्राचार्य डॉ. पंडितराव शा. पवार**

  मराठीचे निवृत्त प्राध्यापक. एम. ए., पीएच. डी. (मराठी); नाशिक जिल्हा मराठा विद्याप्रसारक समाज, नाशिक या संस्थेत ३० वर्षे प्राचार्य. पुणे विद्यापीठाचा उत्कृष्ट प्राचार्य म्हणून पुरस्कार. साहित्य व शिक्षण यांवर लेखन. गेली चाळीस वर्षे उच्चशिक्षण क्षेत्रात कार्यरत.
  ***पत्ता :–*** ६, ऋषिराज पार्क, अरिहंत नर्सिंग होमजवळ, गंगापूर रोड, नाशिक – ४२२०१३.
  दूरध्वनी :- (०२५३) २३४३७८७. भ्रमणध्वनी : ९४२३१८१०८७.

- **प्रा. व्ही. डी. गायकवाड**

  विभागप्रमुख, पदवी व पदव्युत्तर राज्यशास्त्र विभाग, शिवाजी महाविद्यालय, उदगीर
  ***पत्ता :–*** राज्यशास्त्र विभाग, शिवाजी महाविद्यालय, उदगीर, जि. लातूर–४१३५१७. (महाराष्ट्र)
  भ्रमणध्वनी : ९४२३३४३४७३.

- **श्री. अनिलकुमार भाटे**

  आय. आय. टी. (पवई) मध्ये ९ वर्षे विद्युत् अभियांत्रिकी विभागात प्राध्यापक होते. त्यानंतर त्यांनी अमेरिकेतील अनेक विद्यापीठांत संगणक विज्ञान, माहिती–तंत्रज्ञान या विषयांचे अध्यापन केले. विपश्यना, योग, अध्यात्म या विषयांचा त्यांनी सखोल अभ्यास केला आहे. सध्या ते एडिसन सिटी, न्यू जर्सी, अमेरिका येथे वास्तव्य करून आहेत.

  anilbhate1@hotmail.com

अनुक्रमणिका

# आवाहन

'नवभारत' हे वैचारिक मासिक सुरू होऊन आता ६१ वर्षे झाली. साहजिकच मासिकाच्या मूळ कर्त्यांनी जे उद्देश डोळ्यांपुढे ठेवले होते, ते उद्देश स्वीकारून लिहिणारे लेखक व त्या उद्देशांविषयी आस्था बाळगणारे वाचक आता कमी होत चालले आहेत. तरीदेखील वैचारिक आदानप्रदानाचे समर्थ व्यासपीठ म्हणूनच 'नवभारता' ने कार्य करीत राहावे, असाच आमचा संकल्प आहे.

भारतीय परंपरेची ओळख व परिष्करण करून देणारे लेख येतच राहतील. परंतु, विज्ञान, अर्थकारण, तत्त्वज्ञानातील आधुनिक विचारप्रवाह, इतिहासलेखनाला आलेले नवे रूप इत्यादी विषयांची भाष्यरूपाने ओळख करून देणे, नवीन ग्रंथांची समीक्षा करणे, लोकसाहित्य, दलित वाङ्मय यांना जी काळानुरूप वळणे मिळत आहेत त्यांचा मागोवा ठेवणे या विषयांवर भर देणे अगत्याचे झाले आहे. लघुकथा, ललित लेख व कविता या 'नवभारता'ने पूर्वीही कक्षेबाहेर ठेवल्या नव्हत्या व आताही त्या कक्षेबाहेर ठेवलेल्या नाहीत.

आज तालुक्याच्या ठिकाणी महाविद्यालये निघाली आहेत. येथील शिक्षण मराठी भाषेतून चालते व ते योग्यच आहे. तथापि, इंग्रजी वा अन्य भारतीय भाषांतील विचारप्रवाहांशी या शिक्षणाचा संबंध राहू नये, ही खेदाची गोष्ट आहे. या महाविद्यालयांतील ग्रंथालयात अद्ययावत पुस्तके येत नाहीत व आली तरी ती वाचून सकस चर्चा करतील, असे अभ्यासूंचे गटही सहसा असत नाहीत. आमचे अनेक विद्यार्थी या महाविद्यालयांतून प्राध्यापक व प्राचार्य आहेत. त्यांनी ही व्यथा आमच्यापाशी बोलून दाखविली व असेही सांगितले की, 'नवभारता'तील काही लेखांच्या छायांकित प्रती काढून त्यांनी विद्यार्थ्यांना आवर्जून वाटल्या.

आमची अशी खात्री आहे की, महाविद्यालये, तेथील प्राध्यापक व विद्यार्थी तसेच गावोगावी विखुरलेले अभ्यासू नागरिक यांना 'नवभारत' वाचण्याची व त्यातील लेखांवर चर्चा करण्याची सवय लागून जाईल. या सर्वांनी आपले दर्जेदार लेख 'नवभारत' कडे अवश्य पाठवावेत.

यासाठी 'नवभारता'चा प्रसार झाला पाहिजे. आमची वाचकांना अशी विनंती आहे की, त्यांनी 'नवभारता'ला वर्गणीदार मिळवून देण्याची मोहीम चालवावी. जो वाचक पाच वर्गणीदार मिळवून देईल, त्याने सहाव्या व्यक्तीचे नाव व पत्ता कळवावा. त्या सहाव्या व्यक्तीला 'नवभारता' चे अंक वर्षभर आमच्याकडून विनाशुल्क पाठवले जातील. वर्गणीदार कोणत्याही महिन्यापासून होता येते.

वर्षाची वर्गणी रु. ३००/- असून वर्गणी, चेक/डी.डी./मनिऑर्डर यांच्याद्वारे 'नवभारता'च्या पत्त्यावर पाठवावी. चेक/डी.डी. 'नवभारत' मासिक, या नावाने ३१५, गंगापुरी, वाई ४१२८०३ या पत्त्यावर पाठवावे.

– संपादक मंडळ

# लेखकांस आवाहन

*'नवभारत' मासिकामध्ये दर्जेदार वैचारिक लेखनाचे आम्ही नेहमीच स्वागत करतो. पण 'नवभारता' कडे आपले लेखन पाठविण्यापूर्वी काही काळजी घ्यावी, अशी विनंती आहे.*

*१. आपले लेखन सुवाच्य अक्षरात कागदाच्या एकाच बाजूस असावे.*

*२. आपण लेखनासाठी जे संदर्भ वापरले असतील, ते लेखाच्या शेवटी काही टीपा असल्यास त्यांसह द्यावेत.*

*३. महत्त्वाचे म्हणजे आपण आपला लेख यापूर्वी कुठल्याही नियतकालिकात प्रसिद्धीसाठी पाठविलेला नाही, याची स्पष्ट कल्पना 'नवभारत' च्या संपादकांना द्यावी.*

*४. 'नवभारत' मध्ये लेख छापण्यापूर्वी तो संपादक मंडळाच्या योग्य त्या सदस्याकडे वाचनासाठी व अभिप्रायासाठी पाठविला जातो. त्यामुळे तो लेख कुठल्या महिन्यात 'नवभारत' मध्ये येईल किंवा येणार नाही, हे यथावकाश कळविले जाईल, याची लेखकांनी कृपया नोंद घ्यावी.*

*आपल्या सहकार्याबद्दल संपादक मंडळ आपले आभारी आहे.*

*- संपादक मंडळ*

अनुक्रमणिका

आपल्या ग्रंथालयात अवश्य हवीत अशी

## प्राज्ञपाठशाळा मंडळ ग्रंथमालेची

संग्राह्य वैचारिक मराठी प्रकाशने

| | सुधारित किंमत २० नोव्हेंबर २००६ पासून लागू |
|---|---|
| ■ **वैदिक संस्कृतीचा विकास** (तिसरी आवृत्ती) । तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | ३०० रु |
| ■ **अद्वैतसिद्धीचे मराठी भाषांतर** (पूर्वार्ध) । ब्र. स्वामी केवलानंद सरस्वती | २०० रु |
| ■ **पुरोहितवर्गवर्चस्व व भारताचा सामाजिक इतिहास** । डॉ. सुमंत मुरंजन | १२० रु |
| ■ **हिंदी साहित्यविचार** । प्रा. प्यारेलाल गोहेल | २५ रु |
| ■ **श्री. यशवंतराव चव्हाण अभिनंदन ग्रंथ** | ६० रु |
| ■ **संशोधन साधना** । डॉ. वसंत स. जोशी | ६० रु |
| ■ **आर्यांच्या सणांचा प्राचीन व अर्वाचीन इतिहास** । ऋग्वेदी | १५० रु |
| ■ **वागीश्वरी** । डॉ. गो. के. भट | ६० रु |
| ■ **गिर्यारोहण परिचय** । अच्युत खोडवे | ४० रु |
| ■ **इतिहासाचे तत्त्वज्ञान (दुसरी आवृत्ती)** । सदाशिव आठवले | १३० रु |
| ■ **शाहीर हैबती** । डॉ. शिवाजीराव चव्हाण | ४० रु |
| ■ **गीताचिकित्सा** । भाऊ धर्माधिकारी | १४० रु |
| ■ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी** (चरित्र) । सौ. मालती देशपांडे | २५ रु |
| ■ **बौद्ध धर्माचा अभ्युदय आणि प्रसार** । प. ल. वैद्य | ५० रु |
| ■ **हिंदू धार्मिक परंपरा आणि सामाजिक परिवर्तन** (संवर्धित दुसरी आवृत्ती) । मे. पुं. रेगे | १६० रु |
| ■ **पाच पुस्तक-परीक्षणे** । वा. म. कुलकर्णी | ६० रु |
| ■ **भेदविलोपन : एक आकलन** । अशोक केळकर | ३० रु |
| ■ **कॉलिंगवुडची कलामीमांसा – एक भाष्य** । रा. भा. पाटणकर | १०० रु |
| ■ **धर्मश्रद्धा : एक पुनर्विचार** । दि. के. बेडेकर | ३० रु |
| ■ **आचार्य शं. द. जावडेकर : व्यक्तित्व आणि विचार** | १०० रु |
| ■ **तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी, कार्य आणि विचार** | १५० रु |
| ■ **इहवाद आणि सर्वधर्मसमभाव** । मे. पुं. रेगे | १२० रु |
| ■ **प्राज्ञपाठशाळा आणि तिची परंपरा** | २०० रु |
| ■ **चार्वाक : इतिहास आणि तत्त्वज्ञान** (तृतीयावृत्ती) । सदाशिव आठवले | १०० रु |
| ■ **विनोबांची संस्कृत साम्यसूत्रे** (रसग्रहणात्मक मराठी अनुवाद) । वसंत नारगोलकर | १२० रु |
| ■ **नागरी समाज, राज्यसंस्था आणि लोकतंत्र : भारतीय संदर्भात विवेचन** । द. ना. धनागरे | ४० रु |
| ■ **प्राचीन भारत : समाज आणि संस्कृती** (निवडक मौलिक लेखांचा संग्रह) । डॉ. म. अ. मेहेंदळे | ५५० रु |
| ■ **हिंदुधर्माची समीक्षा आणि सर्वधर्मसमीक्षा** (दुसरी आवृत्ती) : तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी | २२५ रु |
| ■ **पाश्चात्त्य नीतिशास्त्राचा इतिहास** (दुसरी आवृत्ती) : प्रा. मे. पुं. रेगे | १६० रु |

१) ग्रंथालये व संस्थांना किंमतीत १० टक्के सूट. पोस्टेजचा खर्च वेगळा पडेल. २) व्ही. पी. ची पद्धत नाही.
३) पैसे मनिऑर्डरने वा ड्राफ्टने पाठवावेत.

*संपर्कासाठी पत्ता :* **चिटणीस, प्राज्ञपाठशाळा मंडळ, ३१५ गंगापुरी, वाई ४१२८०३ (जि. सातारा)फोन ~~:(०२१६७)२२०००६~~**

हे मासिक प्रा. यशवंत कळमकर यांनी सन प्रिंटर्स, गणपती आळी, वाई, पिन : ४१२८०३ येथे छापून सरोजा भाटे यांनी प्राज्ञपाठशाळा मंडळ, वाई यांच्याकरिता तेथेच प्रसिद्ध केले.

अनुक्रमणिका

